# पत्रकार अत्रे

[ आचार्य अत्रे यांचे 'नवयुग' मधील निवडक लेख ]

: संपादिका :

शिरीष पै (अत्रे)



प्रकाशन क्रमांक ८८

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, गिरगांव, मुंबई ४

मूल्य साडेतीन रुपये

# म नो ग त

साप्ताहिक ' नवयुग ' मधल्या ' अत्रे उवाच ' ह्या माझ्या सदरामधले कांहीं निवडक लेख ह्या संग्रहांत एकत्रित केले आहेत. वृत्तपत्रांतले लेखन हें बहुधा नैमित्तिक आणि तात्कालिक महत्त्वाचें असतें. वाङ्मयीन गुणांची त्यामध्यें सहसा कोणी अपेक्षा करीत नाहीं. अर्थात्, दैनिक पत्राच्या संपादकाइतकी साप्ताहिकाच्या संपादकाची कुतरओढ होत नसली, तरी आठवड्याच्या प्रारंभीं तो थोडेंच आपलें लिखाण करून ठेवतो ? कोणत्या आठवड्यांत कोणता विषय महत्त्वाचा आहे, हें आठवडा संपतासंपतच ध्यानांत येतें. अन् मग उरलेल्या वेळांत शक्य तितकी माहिती गोळा करून झपाट्यानें लेख पुरा करावा लागतो. म्हणून ललित वाङ्मय लिहिणाऱ्याला जेवढी सवड आणि मनस्वास्थ्य मिळतें, तेवढें पत्रकाराला मिळूं शकत नाहीं. एका एका शब्दासाठीं दिवसचे दिवस जरी कवि अडून बसला, तरी त्यामुळें कोणाचीही अडचण होण्याचा संभव नसतो. कादंबरीकाराला अन् नाटककाराला तर आपल्या लेखनांत वाटेल तितक्या दुरुस्त्या करावयाला अवधि मिळतो. पण काळ हा पत्रकाराचा मोठा शत्रू असतो. हत्तीच्या गंडस्थळावर माहूत ज्याप्रमाणें अंकुश घेऊन बसलेला असतो, त्याप्रमाणें काळ हा हातामध्यें हातोडा धरूनच पत्रकाराच्या मानगुटीवर आरूढ झालेला असतो. किंवा अधिक परिचयाची उपमा घेऊन बोलावयाचें झाल्यास, परिक्षेला बसलेल्या विद्यार्थ्या-प्रमाणें पत्रकाराची नेहमीं अवस्था असते. ठराविक काळामध्यें त्याला जशी आपली प्रश्नपत्रिका सोडवून द्यावी लागते, त्याप्रमाणें पत्रकाराला प्रत्येक लेख घड्याळ समोर ठेवूनच पुरा करावा लागतो. घाई ही जणूं कांहीं त्याच्या पाच-वीलाच पुजलेली असते.

घाईघाईनें लिहावयाचें अन् तें पुन्हां चांगलें म्हणजे वाचनीय लिहावयाचें ही तर तारेवरची कसरत आहे. ह्या बाबतींत दैनिक पत्राच्या संपादकापेक्षां साप्ताहिक पत्राच्या संपादकावर अधिक जबाबदारी आहे. दैनिक पत्राच्या संपा-दकाला विषयाच्या नि शैलीच्या दृष्टीनें फारसें चोखंदळ राहून चालत नाहीं. शिवाय दीड दोन स्तंभापेक्षां अधिक मजकूर लिहिण्याची त्याला

आवश्यकताहि नसते. तसें साप्ताहिकाच्या संपादकाचें नसतें. त्याचा अग्रलेख हेंच त्याच्या पत्राचें प्रमुख आकर्षण असल्यानें, त्याला आपला विषय फार काटेकोर-पणें निवडावा लागतो. आणि त्याचें निरूपण विस्तारानें करावें लागतें. दैनिक पत्रांच्या संपादकांना वाटतें कीं आपलेंच काम जास्त जिकीरीचें आहे. पण हा केवळ त्यांचा गैरसमज आहे. साप्ताहिकाच्या संपादकावर सात दिवसांचा बोजा एकदम येऊन पडतो हें त्यांना माहित नाहीं.

खरें म्हटलें तर सगळेंच लेखन हें कष्टाचें आहे. अन् चांगल्या लेखनाला तर फारच श्रम पडतात. वाङ्मयांत स्फूर्तीचा गवगवा निष्कारण झाला आहे. पण स्फूर्ति म्हणजे कांहीं जादू नाहीं कीं तिचा झटका आला कीं, कोंबडीच्या अंगांतून असें अंडें बाहेर पडतें, तसें लेखकाच्या डोक्यांतून लेखनाचें पुडकें एकदम प्रकट होतें. मी माझेंच सांगतों ना, मला आठवते तसा मी लिहितोच आहे. लेखनाची मला मनस्वी हौस आहे. तरी देखील आपल्याला आतां लिहावयाचें आहे हा विचार मनांत आला कीं, अद्याप अंगावर कांटा उभा रहातो. नको वाटतें लिहिणें. तासन् तास सारखें बैठक मारून बसावें लागतें. बुद्धिला अन् शरीराला कष्ट पडतात, पण लिहिण्यावाचून गत्यंतरच नाहीं. म्हणून आळोखे पिळोखे देत देत शेवटीं लेखणी हातांत धरावीच लागते. गेलीं चौदा वर्षे माझ्या साप्ताहिकानें मला वेठीवर धरून भारेच्या भारे माझ्याकडून लिहून घेतले आहेत. नाहींतर माझ्या हातून कांहीं एवढें लिखाण कधीं झालें नसतें. अन् अजूनहि ही बिगार संपलेली नाहीं.

त्यांतून मी कांहीं नुसताच पत्रकार नाहीं. माझ्या मागें अनेक व्यवधानें. अगदीं शेवटचा दिवस उगवला म्हणजे मी जागा होतों. ऐन वेळेपर्यंत कोणत्या विषयावर लिहायचें याचा बहुधा माझ्या मनांत निर्णय झालेला नसतो. लेख-नाला सुरवात करावी तर कोणीतरी भेटायला येते. भेटायला आलेले माणूस लौकर थोडेंच उठते ? उलट ' माझ्या येण्यामुळें व्यत्यय तर आला नाहीं ! ' असें म्हणत म्हणत तें आपला मुक्काम वाढवित असते. मग अर्धवट त्याच्याकडे लक्ष्य, अर्धवट विषयाकडे लक्ष्य, अशा थाटांत हळू हळू लिहिणें चालू होतें. मधून मधून ' फोन'ही येतच असतो. जसे जसे कागद लिहिले

येतात, तसे तसे ते जुळाऱ्यांकडे जाऊं लागतात. त्यामुळें मागला सर्व संदर्भ डोक्यांतच ठेवावा लागतो. छापखान्याचें यंत्र बाहेर धडाधड वाजत असतें. मजकुरासाठीं जुळाऱ्याची ये जा अधिक झपाट्यानें सुरू होते. अशा वेळीं एकादा मुद्दा न सुचल्यानें किंवा वाक्याची रचना मनाप्रमाणें न झाल्यानें लेखनाच्या गतीमध्यें क्षणमात्र खंड पडला तर जीव असा कासावीस होतो म्हणता. तशांत खोडाखोड का सुरू झाली म्हणजे अशी चीड येते स्वतःची स्वतःच्याबद्दल. वाटतें, कीं सारा मजकूर फाडून फेकून द्यावा. पण सबंध लेख पुरा केल्यावांचून त्या चरकामधून बाहेर थोडेंच पडतां येते? वाघाच्या तोंडांत सांपडलेल्या जनावराप्रमाणें कितीही तडफड केली तरी शेवटचा पूर्णविराम दिल्याखेरीज लेखाच्या जबड्यांतून सुटका होत नाहीं.

स्वतः हातांनीं लेख लिहिण्यापेक्षां तो दुसऱ्याला तोंडीं लिहावयाला सांगणें हें ह्या दृष्टीनें मला फार सोयीस्कर वाटतें. शारीरिक कष्टाची त्यामुळें केवढी तरी बचत होते. सांगितलेले वाक्य लेखक लिहित असतां पुढल्या वाक्याचा विचार करावयाला सवड मिळते. अन् म्हणून विचाराचें सूत्र अखंड नि सुसंगत रहातें. 'नवयुग' मधले माझे कित्येक महत्त्वाचे लेख मी ह्याच पद्धतीनें लिहिले आहेत. तथापि, तोंडानें लेखन सांगण्याची ही पद्धत सर्वांनाच जमत नाहीं. तिची संवय व्हावी लागते. अन् अंगांत आत्मविश्वासही असावा लागतो. तथापि, असें असूनही कित्येक विषय असे असतात, कीं त्यावर स्वतःच्या हातांनीं लिहिल्यावांचून बरेंच वाटत नाहीं. पत्रकारावर वेळेचें जसें बंधन असतें, तशी स्थळाचीही मर्यादा असते. चार स्तंभ मजकूर पाहिजे असें जुळाऱ्यांनीं सांगितलें म्हणजे नेमका तेवढाच मजकूर लिहून द्यावा लागतो. एक ओळही जास्त खपत नाहीं. कित्येकदां ऐनवेळीं जाहिराती येतात. अन् मग लिहिलेल्या नि जुळलेल्या मजकुरांतील दहावीस ओळी एकदम कमी करा असा 'आंतूच' हुकूम होतो. विषयाची हानि न होऊं देतां मधलाच मजकूर सांगितल्याबरोबर 'कटाप' करण्याचें हें तंत्र फार अवघड आहे. ह्याच्या उलट अधिक मजकूर हवा अशीही कित्येकदां मागणी होते. विषय कधींच संपण्याच्या बेताला आलेला असतो. अशा वेळीं पुनरावृत्ती टाळून पुन्हां विषयाला फोडणी द्यावयाची म्हणजे कांहीं चेष्टा नव्हे. अशी एक ना दोन अनेक व्यवधानें संपादकाला सांभाळावीं लागतात.

लेख संपला म्हणजे शेवटीं त्याला मथळा देणें हें तर सर्वांत अवघड काम होय. पत्रकाराच्या कौशल्याची अन् कर्तृत्वाची ही तर सर्वांत मोठी कसोटी होय. लेखाचें आकर्षकत्व आणि वाचनीयत्व कितो तरी पटींनें नुसत्या मथळयानें वाढवतां येतें. मथळा तर अन्वर्थक असेल तर अगदीं सामान्य लेखांतही तो जिवंतपणा निर्माण करूं शकतो. त्याच्या उलट, वाईट मथळयानें उत्तम लेखाचेंही मातेरें होतें. फर्मास मथळे देण्याच्या कामीं अच्युतराव कोल्हटकर अन् काकासाहेब लिमये ह्यांचा मोठा हातखंडा होता. त्यांच्यापासूनच मी ही कला शिकलों असें म्हटलें तरी चालेल. वाचकांच्या मनावर जास्तींत जास्त परिणाम कसा होईल इकडे पत्रकाराला अधिक लक्ष्य द्यावें लागतें. हा अर्थात् वाङ्मयाचा भाग आहे. पूर्वीच्या पत्रकारांना भाषेचें शास्त्र उत्तम प्रकारें अवगत असे. म्हणूनच त्यांच्या लेखनाची विशिष्ट शैली तयार होई. विषयाच्या ज्ञानाइतकेंच भाषेच्या शैलीलाही त्यावेळीं महत्त्व असे. वाङ्मयानें वृत्तपत्राची अप्रतिष्ठा होते अशी आजकालच्या कित्येक पत्रकारांनी आपली समजूत करून घेतलेली आहे. वृत्तपत्रीय लेखन ललित वाङ्मय आहे असें मी म्हणत नाहीं. केवळ आकर्षक शब्दांची आरास मांडून कांहीं अग्रलेख तयार होत नाहीं. त्याचबरोबर एखाद्या सरकारी अहवालाप्रमाणें उताऱ्यांचा, आकड्यांचा, अन् कोष्टकांचा वाचकांवर भडिमार केला म्हणजे आपण कृतकृत्य झालों असेंहि पत्रकारांनीं मानण्याचें कारण नाहीं. लालित्याच्या अतिशयोक्तीप्रमाणें गांभीर्याचाहि अतिरेक पत्रकारानें टाळावयास हवा. पुष्कळशा वृत्तपत्रांतील अग्रलेख इतके क्लिष्ट आणि दुर्बोध असतात, कीं सर्वसामान्य वाचक त्यांच्याकडे ढुंकूनहि बघत नाहीत. कित्येकदां तर संपादक हे लेख कां लिहितात ह्याचाच मुळीं भ्रम पडतो. विवेचनाची सुबोधता आणि भाषेचा प्रसाद हे दोन वाङ्मयीन गुण तरी कमींत कमी प्रत्येक पत्रकाराच्या अंगीं असावयासच पाहिजेत.

वाचकांच्या विचाराला चालना देणें हें जसें पत्रकाराचें काम आहे, त्याप्रमाणें त्याची भावना चेतविणें हेंहि त्याच कलेचें एक अंग आहे. राजकारण हें मूळांतच मोठें प्रक्षोभक आहे. प्रभावी भाषाशैलीमध्यें जर एकादा राजकीय लेख लिहिला तर आगींत घासलेट ओतावें असा भडका उडतो. स्वकीयाचे डोळे दिपतात, तर विरोधकांच्या अंगाचा दाह उडतो. स्तुतीच्या नि शिव्यांच्या पत्रांचा

त्याजवर पाऊस पडतो. गेल्या चौदा वर्षांमध्यें अनेकदां हा अनुभव मला आलेला आहे. नुसत्या एका एका लेखामुळें माझ्यावर प्राणांतिक हल्ले झाले आहेत अन् फौजदारी फिर्यादींचें मोहोळ उठलें आहे. सत्तेचाळीस सालीं देशाची फाळणी झाली, तेव्हां फाळणीला संमति देणाऱ्या राष्ट्रघातकी राजकीय धोरणावर जवळ-जवळ एक वर्षपर्यंत मी जो ' नवयुग ' च्या अन् ' जयहिंद ' च्या स्तंभांमधून तोफखाना डागला, तो वृत्तपत्रीय लेखनाचा एक वैशिष्ट्यपूर्ण विक्रम म्हणून समजावयाला कांहीं हरकत नाहीं. सरकारी अवकृपेचा मी त्यावेळीं जवळ जवळ उच्चांकच मोडला म्हणानांत. ' तुमचें हें लिखाण वाचवत नाहीं !" असा त्यावेळीं माझ्या एका विद्वान् व्यवसायबंधूनें मला बघतांच हंबरडा फोडला, तो मी तरी कधीं विसरणार नाहीं. राजकीय प्रतिपक्ष्यांच्या विचाराची आणि युक्तिवादाची बंभेरी उडविणें एवढेंच कांहीं पत्रकारांचें काम नाहीं. सज्जनांचा पुरस्कार, अनाथांचा कैवार अन् दांभिकाचा धिःकार अशा विचारांच्या नि भावनेच्या विविध क्षेत्रामधून पत्रकाराला विहार करावा लागतो. अनेक रसांचीं कारंजीं त्याला आपल्या प्रतिभेमधून खेळवावी लागतात. ' मृत्युलेख ' ही तर पत्रकाराच्या लेखन सामर्थ्याची सर्वांत मोठी कसोटी आहे. किंबहुना, मृत्युलेख ही पत्रकाराची ' वार्षिक परीक्षा 'च होय, असें मी समजतों. सार्वजनिक माणसाचा मृत्यु ही वृत्तपत्रीय जीवनामधली एक अत्यंत महत्त्वाची घटना होय. त्या व्यक्तीच्या जीवनाचें आणि कार्याचें मूल्यमापन करतांना केवळ त्याच्या चरित्रामधल्या प्रसंगाचीं जंत्री देऊन भागत नाहीं. तर तो ज्या राजकीय, सामाजिक वा वाङ्मयीन प्रवृत्तींचा प्रतिनिधी असेल, त्याचें अत्यंत रसपूर्ण आणि मार्मिक विश्लेषण संपादकाला करावें लागते. ही सर्व माहिती जमा करावयला वेळही फारसा नसतो. व्यापक सहानुभूति आणि प्रखर स्मरणशक्ति ह्यांचें भरपूर भांडवल जर संपादकाजवळ नसेल तर तो ह्या कसोटीमधून उत्तीर्ण होणें कठीण आहे.

माझा पिंड साहित्यिकाचा आहे. तथापि, वृत्तपत्राच्या व्यवसायाचें मला पहिल्यापासूनच आकर्षण आहे. आगरकर; शिवरामपंत परांजपे आणि अच्युतराव कोल्हटकर ह्यांच्या उज्ज्वल ध्येयवादानें आणि लेखनानें मला ह्या क्षेत्रांत ओढून आणलेलें आहे. राजकीय तत्त्वज्ञानाचा मी कांहीं शास्त्रीय अभ्यास केलेला नाहीं. मानवतेचा मी उपासक आहे. स्वातंत्र्य आणि समता हीं मानवी जीवनांतील अत्युच्च

मूल्यें आहेत, असें मी मानतों. ह्या मूल्यांची पूजा करावयास जास्तींत जास्त संधि मला वृत्तपत्रव्यवसायांत मिळते, म्हणूनच मी ह्या व्यवसायांत अजूनही वावरतों आहे. माझ्या लेखनाच्या सर्व मर्यादा मी जाणतों. तथापि, कोणत्याही प्रतिगामी किंवा विकृत विचारसरणीचा मी माझ्या लेखनांत आजपर्यंत कधीं पुरस्कार केलेला नाहीं किंवा दुष्टपणानें वा मत्सरानें प्रेरित होऊन मी कोणावरही हात उगारलेला नाहीं. सहानुभूतीचा अन् सद्भावनेचा पुरस्कार करण्यासाठींच मी माझी लेखणी आतापर्यंत झिजवली आहे, एवढें जरी मला श्रेय मिळालें तरी पुष्कळच आहे !

१० जून १९५३ —प्रल्हाद केशव अत्रे



## काशीबाईची करुण किंकाळी : : १

"मी पाया पडतें! माझें लुगडें फेडूं नका! माझी अब्रु घेऊं नका!" अशी एका असहाय्य मातेची आर्त किंकाळी १९ ऑक्टोबर १९४४ रोजीं दुपारीं बारा वाजतां कोल्हापूर संस्थानांतील चिखलव्हाळ गांवच्या चावडीमधून बाहेर उठली! पोलिसाचे काळे डगले घातलेल्या दोन नरपशूंनी एका अनाथ अबलेच्या दंडाला धरून तिच्या लुगड्याला हात घातला होता. आणि हातांत चामड्याचा पट्टा घेऊन, फौजदाराचा पोशाख चढविलेला एक मदोन्मत्त राक्षस त्या स्त्रीचा बुचडा धरून गरगरा डोळे फिरवीत, मोठमोठ्यानें ओरडत होता, "फेडा-फेडा रांडेचा कासोटा!" त्या स्त्रीचा दीनदुबळा नवरा हात जोडून त्या राक्षसाच्या पायांपाशीं लोळण घेत होता. आणि तिच्या पोटीं जन्म घेतलेली पांच बालकें हंबरडा फोडून धाय मोकलून रडत होती; पण त्या अनाथ मातेच्या करुण किंकाळीचा, तिच्या असहाय्य पतीच्या विनवणीचा किंवा तिच्या त्या पांच अर्भकांच्या आक्रोशाचा त्या फत्तर काळजाच्या फौजदारावर एवढासा देखील परिणाम झाला नाहीं! उलट त्या स्त्रीच्या कासोट्याला स्पर्श करतांना त्या नादान नोकरांचे हात थरथर कापूं लागले, म्हणून संतापून जाऊन त्या नरपशू फौजदारानें स्वतःच्या हातानें त्या साध्वीचा कासोटा फर्रकन् सोडला आणि तिच्या कमरेंत लाथ मारून, तिला खालीं पाडलें! एका क्षणांत तिच्या अंगावरचें वस्त्र हिसकावलें गेलें. आणि तिची लाज भरदिवसां एका सार्वजनिक चावडीवर चार चौघां-समोर, तिच्या नवऱ्यादेखत आणि तिच्या पांच मुलांसमक्ष अक्षरशः उघडी पडली! चामड्याच्या पट्याचें निर्घृण घांव सपासप तिच्या उघड्या अंगावर वाजूं लागलें! पण त्या कठोर घावांच्या तीव्र वेदनेचे तिला त्यावेळीं कांहींच वाटलें

नाहीं! आपलें तोंड दोन्हीं हातांनीं झांकून जमिनीवर गडबडा लोळत तिनें हंबरडा फोडला, "माझी अब्रू गेली हो गेली! माझी अब्रू गेली हो गेली!"

ढगांची काळीकुट्ट काळीजें टराटर फाडीत वीज ज्याप्रमाणें आभाळांतून आरपार जाते, तशी काशीबाईची ती करुण किंकाळी दाहीं दिशांच्या छातीच्या चिंधड्या करीत, आकाशाची कड्याकपाटें फोडून स्वर्गामधल्या तेहतीस कोटीं देवांच्या कानांपर्यंत जाऊन थडकली असेल! पण काशीबाईच्या बेअब्रूवर पांघरूण घालण्यासाठीं एकही स्वर्गस्थ देव त्यावेळीं चिखल-व्हाळच्या चावडीवर धांवून आला नाहीं! किंबहुना, भगवान् सूर्यनारायण आपले बाराही डोळे सताड उघडे ठेवून दिवसाढवळ्या चाललेली एका सतीची अघोर विटंबना आभाळांतून गमतीनें पहात होता! त्यानें मनांत आणलें असतें तर आपल्या तेजःसंपन्न नेत्राच्या नुसत्या एका कटाक्षानें त्या दुरात्म्या इंगवल्याच्या देहाचा एका क्षणांत भडका उडवून दिला असता! पण तसें कांहीं एक झालें नाहीं! काशीबाईच्या करुण किंकाळीनें आकाश हादरलें, स्वर्ग हादरला, तें टीचभर रुंदीचें चिखलव्हाळ हादरलें, तें वीतभर रुंदीचें कोल्हापूर हादरलें; एवढेंच नव्हें तर ती किंकाळी ऐकून ज्याच्या अंगावर सरसरून शहारा उभा राहिला नाहीं असा ह्या महान् भरतखंडामधल्या चाळीसकोटी रहिवाशांपैकीं क्वचित्च एकादा मुर्दाड प्राणी सांपडूं शकेल! पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं! कोल्हापूर संस्थानांत जन्मलेल्या ह्या सवाई दुःशासनानें भरदिवसां गांवच्या चव्हाट्यावर एका सतीचें केवळ वस्त्रहरण करूनच तिची लाज नागवीउघडी केली नाहीं, तर तिच्या मातृत्वाची अघोर हत्या करून तिच्या अंगावर रक्ताचे ओघळ वहावयाला लावले! पण या अत्याचारी दुःशासनाचा हात त्याच्या धडापासून उखडून काढावयास त्यावेळीं स्वर्गांतल्या तेहतीस कोटी देवांपैकीं एकहि पाठीराखा देव जसा खालीं उतरला नाहीं, तसा चाळीस कोटी वसतीच्या या देशामधला एकहि मायेचा पूत त्या क्षणीं पुढें झाला नाहीं! तेहतीस कोटी देवांनीं आणि चाळीस कोटी माणसांनीं उघड्या डोळ्यांनीं काशीबाईची ती विटंबना सहन केली. आणि "माझी अब्रू गेली हो गेली!" हा तिचा हृदयभेदक हंबरडा कानांत बोटें न घालतां तसाच उघड्या कानानें ऐकून घेतला!

या जगाचा उद्धार करण्यासाठीं प्रत्येक युगांत परमेश्वर अवतार घेत असतो असें या देशांतील आपण श्रद्धाळ हिंदु आजपर्यंत मनोभावानें मानीत

आलों. आम्हांला कांहीं हें ठाऊक नव्हतें; पण खुद्द भगवंतांनीच हें आपल्या गीतेमध्यें आम्हांला आश्वासन देऊन ठेवलेलें आहे. मग हें जर खरें असेल, तर या जगाचें वाटोळें करण्यासाठीं प्रत्येक युगांत कलिपुरुषही उत्पन्न होत असले पाहिजेत असें मानल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं! किंबहुना, जगांत वारंवार थैमान घालणाऱ्या दुष्ट दानवांना जमिनदोस्त करण्यासाठींच परमेश्वराला वरचे-वर खालीं उतरावे लागत असलें पाहिजे. भारताच्या त्या भाग्यशाली काळांत दुर्योधन–दुःशासनादि कौरवांनीं आमच्या या पवित्र भूमीवर अगणित पापांचें डोंगर रचून ठेवलें, म्हणूनच त्यांचें निर्दालन करण्यासाठीं भगवान् श्रीकृष्णाला आमच्या या देशांत अवतार घ्यावा लागला. आतां इतिहासाची एकसारखी पुनरावृत्ति होत असते असें आमचे आधुनिक इतिहासपंडित आम्हांला सांगतात. म्हणून आम्हीं विचारतो, "इतिहासाची ही प्राचीन प्रवृत्ति किंवा पुनरावृत्ति सध्यां काय आजारी पडली आहे किंवा काय? म्हणजे इतिहासांतल्या वाईट गोष्टी तेवढ्या नेमक्या पुन्हां पुन्हां घडून आलेल्या आम्हांला दिसतात आणि चांगल्या मुळींच घडून येत नाहींत, हें आहे तरी काय? तसें नसतें तर, सध्यांच्या या युगांत इंगवल्यासारख्या कलिपुरुषांना निष्कारण ऊत कां आला असतां? आणि आमच्या पोलिसांप्रमाणें गुन्ह्याच्या ठिकाणीं परमेश्वर तरी नेमका बेपत्ता कां झाला असतां?

परमेश्वरानें ह्या भारतवर्षांत जन्म घ्यावा, एकदांच नव्हे पण शेंकडों वेळां घ्यावा, असें एकापेक्षांहि एक भीषण अत्याचार गेल्या दोनशें वर्षांत या दुर्दैवी देशांत अनेक वेळां घडून आलेले आम्हांला माहित नाहीं काय? धनधान्यानें भरलेला, सुवर्ण संपत्तीनें शोभविलेला आणि मुलांमाणसांनीं फुललेला एवढा आमचा हा प्रचंड देश! तो हा देश मेलीं दीडशें वर्षें चाळीस कोटी गुलामांचा एक भेसूर कोंडवाडा होऊन बसलेला आहे, तरी देखील तो आमचा परमेश्वर अद्यापि इथें अवतार घेऊन प्रकट होत नाहीं याचा अर्थ काय आहे? परकी राज्यकर्त्यांनीं या देशांतील लाखों लोकांची अन्नान्नदशा करून टाकलेली आहे. अंगावर कपडा नाहीं. डोक्यांत शिक्षण नाहीं. हातांत शस्त्र नाहीं. रहावयाला घर नाहीं. पेरा-यला शेत नाहीं. जगायला काम नाहीं आणि लढायला धाम नाहीं! असें नरकांतील किड्यांपेक्षांहि लाचारीचें जिणें आज लक्षावधि लोकांवर बळजबरीनें

लादलें गेलें, तरी त्या परमेश्वराला वर स्वस्थ बसविलें तरी कसें? कांहीं वर्षांपूर्वी आमच्या दयाळू राज्यकर्त्यांनीं अमृतसरमधील जालियनवाला बागेंत निरपराधी जीवांचा जो कसाईखाना उघडून दाखविला, तो त्या परम कारुणिक परमेश्वराला उघड्या डोळ्यांनीं पहावला तरी कसा? आणि आज! आज पांच हजार मैलांवरच्या एका परकी राष्ट्रांच्या नरड्याला लागलेली जर्मन तात तोडण्यासाठीं आमचे लाखों सैनिक आपल्या रक्तामासांच्या नद्या वाहवीत असतां त्यांच्या हातांपायांतील गुलामगिरीच्या बेड्या काढून त्यांना स्वातंत्र्य देण्याची नुसती भाषा देखील ज्या राष्ट्रांतील कृतघ्न नेत्यांच्या तोंडून निघत नाहीं, त्या लोकांच्या साम्राज्यलोभी दुष्टपणाचा कायमचा एकदां निकाल लावून टाकावा, अशी कल्पना देखील त्या परमेश्वराच्या डोक्यांत अद्यापि कां येत नाहीं? एवढा मोठा आमचा सुजल, सुफल आणि सस्यश्यामल बंगाल! पण या अन्नोदकसंपन्न भूमीला पस्तीस लाख मुडद्यांच्या स्मशानाची जेव्हां कळा आली, तेव्हां तें दृश्य स्वर्गामधून त्या दयामय आणि दीनवत्सल परमेश्वराला पहावलें तरी कसें? पारतंत्र्यांत पिचत पडलेली आपली मातृभूमि स्वतंत्र व्हावी म्हणून देशांतील तारुण्य, सामर्थ्य आणि प्रतिभा वर्षानुवर्ष कारागृहांत कुजत पडलेली असतां आणि आपल्या सर्वस्वाचें बलिदान करावयासहि सिद्ध असतां, या प्राणाच्या आणि रक्ताच्या नैवेद्यानें तो भक्तांच्या नवसास पावणारा परमेश्वर अद्यापि कां प्रसन्न झाला नाहीं बरें?

तेव्हां ह्या सर्व गोष्टींचा अर्थ एवढाच आहे कीं, दुःखितांच्या किंवा अनाथांच्या किंकाळ्या ऐकून त्यांच्या सहाय्यासाठीं, संरक्षणासाठीं किंवा उद्धारासाठीं अवतार घेण्याच्या आपल्या जुन्या वचनाला परमेश्वरानें या युगांत तरी हरताळ फासल्यासारखें दिसतें. हो, तसेंच असलें पाहिजे! कारण तसें नसतें, तर त्या नराधम इंगवल्यानें चिखलव्हाळच्या चावडीवर दीनदुबळ्या काशीबाईला नागवी करण्यासाठीं आपला पापी हात जेव्हां तिच्या कासोट्याला घातला आणि "माझें लुगडें फेडूं नका!" असा त्या अनाथ माऊलीनें जेव्हां शेवटचा हृदयभेदक हंबरडा फोडला, तेव्हां तिच्या मदतीसाठीं त्या चावडीच्या खांबाखांबामधून नरसिंहाप्रमाणें कडकडून आणि गडगडून, परमेश्वर त्या ठिकाणीं प्रकट झाला नसतां काय? बोला, झाला नसतां काय? काशीबाईच्या कमरेंत लाथ घालणाऱ्या त्या उन्मत्त इंगवल्याला आडवा

पाडून त्याचा एका क्षणांत हिरण्यकश्यपू करून टाकणें हें त्या परमेश्वराला काय अशक्य होतें? अर्धनग्न स्थितींत द्रौपदीला दुःशासनानें राजसभेंत फरफरा ओढीत आणलें, पण तिची लाज, साऱ्या सभाजनांपुढें उघडीनागडी करण्याचा त्याचा पापी प्रयत्न परमेश्वरानें त्यावेळीं यशस्वी होऊं दिला नाहीं! त्या राजसभेंत द्रौपदीनें जसा आपल्या पाठीराख्या परमेश्वराचा धांवा केला, तसा धांवा गरीब बिचाऱ्या काशीबाईनें त्या अनाथाच्या नाथाच्या नांवानें त्या वेळीं केला नसेल काय? अरेरे, काशीबाईनें परमेश्वराचा कसा आणि किती धांवा केला तें फक्त तिची विटंबना करणाऱ्या त्या इंगवल्याला आणि तिची उपेक्षा करणाऱ्या त्या परमेश्वरालाच ठाऊक! पण काशीबाईनें फोडलेला तो करुण टाहो ऐकून, त्या इंगवल्याचें फरसबंदी काळीज जसें द्रवलें नाहीं, तसा तिचा तो हृदयभेदक हंबरडा ऐकून क्षीरसागरांत वामकुक्षी घेत बसलेल्या शेषशायी भगवंताचें अंतःकरण देखील द्रवलें नाहीं! दुःशासनानें द्रौपदीचा नुसता पदर ओढला तर तिच्या अब्रूवरचें पांघरूण उघडें पडूं नये म्हणून वस्त्रांचा डोंगरच्या डोंगर खांद्यावर घेऊन प्रत्यक्ष परमेश्वर तेथें धांवत आला! आणि इकडे त्या सवाई दुःशासनानें काशीबाईला मुलामाणसांदेखत नागवीउघडी करून तिच्या स्त्रीत्वाची अमानुष विटंबना केली—नव्हे तिच्या मातृत्वाचा अघोर विध्वंस केला, तरी तिची लाज राखण्यासाठीं परमेश्वर राहूं द्या—निदान परमेश्वराचा एकादा औरस किंवा दत्तकपुत्र देखील धांवून पुढें येऊं नये का? राजसभेमध्यें द्रौपदीवर झालेल्या विटंबनेबद्दल परमेश्वरानें केवळ दुःशासनाचाच नव्हे तर त्याच्या मागें असलेल्या साऱ्या पाशवी राजसत्तेचाहि विध्वंस करून सूड घेतला! आणि भगवान् सूर्यनारायणाला साक्षी ठेवून काशीबाईवर अमानुष अत्याचार करणाऱ्या त्या नराधम इंगवल्याला मात्र परमेश्वरानें आहे तसाच अद्यापि शाबूत ठेवलेला आहे! उलट, त्याच्या पापावर निर्लज्जपणें पांघरूण घालणारी नादान नोकरशाही आपलें बेमुर्वतखोर नाक उडवीत जगासमोर मोठ्या दिमाखानें मिरवीत आहे, तरी परमेश्वराचे हात अद्यापि शिवशिवत नाहींत म्हणजे काय आहे बरें?

तेव्हां ह्या सर्व गोष्टीचा अर्थ एवढाच आहे कीं, यापुढें तुमचाआमचा उद्धार तो परमेश्वर करील या आशेनें आभाळाकडे तोंड करून बसण्यांत

कांहीं एक अर्थ नाहीं. पुष्कळ वर्षांपासून परमेश्वराचें आणि या देशाचें वांकडें आलेलें आहे. आणि सध्यांतरी परमेश्वर तुमचा–आमचा नव्हेच नव्हे. परमेश्वर ब्रिटिश सरकारचा आहे! परमेश्वर चर्चिलचा आहे! परमेश्वर ट्रूमनचा आहे! परमेश्वर स्टॅलिनचा आहे! दीडशें वर्षे हिंदुस्थानला गुलामगिरींत ठेवणाऱ्या साम्राज्यशाहीच्या गळ्यांत फिरून फिरून विजयाचे हार घालणारा परमेश्वर हा हिंदुस्थानचा नसून ब्रिटिश साम्राज्यशाहीचा आहे हें खोटें आहे काय? एकाद्या पांढऱ्या रंगाच्या काशीबाईच्या झग्याच्या नुसत्या किनारीला कोणी हात लावला असता तर तो हात कलम करून चर्चिल–स्टॅलिनला खूष करण्यासाठीं परमेश्वरानें आपल्या जिवाचें रान केलें असतें; पण गुलाम राष्ट्रांतील एका काळ्या काशीबाईच्या संरक्षणासाठीं परमेश्वरानें तरी आपल्या अनंत हस्तांपैकीं एकाद्या हस्ताला काय म्हणून कष्ट द्यावेत? नका, नका, परमेश्वरा! भारतवर्षांतील आम्हां नादान गुलामाच्या रक्षणासाठीं इतक्या लांबून आकाशामधून धांवत येण्याचें किंवा येथेंच येऊन एकादा अवतार घेण्याचे कष्ट तुम्हीं घेऊं नका!

देव म्हणा किंवा दैव म्हणा—हें दीन दुबळ्याचे पाठीराखें नसतेंच नसतें हें आम्हांला आतां चांगलें कळून आलेलें आहे! ज्याच्या मनगटांत सामर्थ्य असतें, त्याच्या पायाशीं परमेश्वर लोळण घेतो आणि त्याच्याच घरांत परमेश्वर शागिर्दी करतो हें अगदीं खरें! आमच्या दंडांत जर ताकद असती आणि आमच्या अंगांत जर पौरुष असतें तर काशीबाईच्या सहाय्यासाठीं आम्हांला सरकारच्या कायद्याकडे किंवा परमेश्वराच्या वायद्याकडे आशाळभूतपणें डोळे लावून कशाला बसावें लागलें असतें? परमेश्वर तेथें जाऊन पोहोंचावयाच्या आधींच आम्हीं तेथें जाऊन थबकलों नसतों कां! पण आम्हीं गुलाम आहोंत. आम्हीं परतंत्र आहोंत. निःशस्त्र आहोंत. आम्हीं षंढ आहोंत. आमच्याजवळ सामर्थ्य नाहीं. आम्हांला अभिमान नाहीं. आम्हाला लाज नाहीं कीं लज्जा नाहीं. आम्ही नादान आहोंत. आम्ही भ्याड आहोंत. कोणीहि उठावें आणि आमच्या बायकांना फरफर ओढीत चावडीवर न्यावें आणि त्यांना नागवे करून त्यांच्या अब्रूचे दिवसाढवळ्या धिंडवडे काढावेंत! पशूनें पशूवर देखील अत्याचार करूं नयेत ते माणसांना आपल्या रक्ता-

मांसांच्या देशबांधवावर करावेत ! अरेरे, आणि ही सारी बेअब्रू आणि विटंबना आम्ही उघड्या डोळ्यांनी पहावी आणि आपले निर्लज्ज जिणें चिखलांतील किड्याप्रमाणें तसेंच कंठावें ! छें, छे, परमेश्वराला हांकसुद्धां मारण्याची आमचीं लायकी नाहीं. जोंपर्यंत आम्हीं गुलाम आहोंत तोंपर्यंत तो आम्हांला कसलेंहि सहाय्य करूं शकणार नाहीं ! आमच्या हातापायांतल्या बेड्या जेव्हां आम्हीं तोडून टाकूं आणि आमची पोलादी मनगटें जेव्हां आम्हीं मोकळीं करूं, तेव्हां परमेश्वरासकट सर्व जगाला वठणीवर आणावयाला आम्हांला फारसा वेळ लागणार नाहीं !

पण तोंपर्यंत अभागिनी काशीबाई, तुला असेंच रडत बसावें लागेल ! तुझ्या गालावरच्या अश्रूंच्या धारा आणि तुझ्या देहावरचे रक्ताचे ओघळ पुसून काढण्याचें सामर्थ्य गुलामगिरीच्या बेड्यांनीं बांधलेल्या ह्या हातांमध्यें नाहींच नाहीं ! अत्याचारी हातांनीं फेडलेले तुझें पवित्र वस्त्र, तुला पुन्हां नेसवून तुझी उघडीनागडी पडलेली लाज झांकून टाकण्याची ताकद या श्रृंखलाबद्ध बाहूंमध्यें नाहींच नाहीं ! रड, अभागिनी काशीबाई, माते काशीबाई, रड, ! तुझ्या आक्रोशाच्या ह्या करुण किंकाळ्या दशदिशांत आणि साऱ्या देशांत एकसारख्या निनादूं देत ! "चाळीस कोटी गुलामांच्या या नादान देशांत माझ्या अब्रूवर पांघरूण घालणारा एकहि मायेचा पूत पुढें आला नाहीं ? माझी अब्रू गेली हो गेली !" असा मोठमोठ्यानें तूं हंबरडा फोडीत रहा ! दुराचारी दुःशासनाचें पारिपत्य करणारा एकहि बलाढ्य भीम या भारतवर्षांत आजच्या घटकेला उरलेला नाहीं, म्हणून मोठमोठ्यानें तूं टाहो फोडीत रहा ! तुझ्या ह्या आक्रोशामध्यें, तुझ्या ह्या आक्रंदनांमध्यें आपल्या गुलाम राष्ट्राचा खरा उद्धार आहे ! तुझ्या करुण किंकाळींमधूनच आमचा उद्यांचा उद्धारकर्ता परमेश्वर निर्माण होणार आहे ! काशीबाई, ही केविलवाणी किंकाळी केवळ तुझीच नाहीं ! दीडशें वर्षे नाडल्या आणि ताडल्या गेलेल्या आपल्या मायभूमीची ती किंकाळी आहे ! तुझ्यावर जसा एका इंगवल्यानें अत्याचार केलेला आहे, तसे अनेक अत्याचार या आपल्या मायभूमीवर अनेक इंग्रज इंगवल्यांनीं आजपर्यंत केलेले आहेत ! तुझी अमानुष विटंबना डोळे उघडे ठेवून तुझ्या पांच पुत्रांना जशी मुकाट्यानें पहावी लागली, तशी आपल्या मातृभूमीची राक्षसी विटंबना चाळीस कोटी मुलांना आपलें डोळे उघडे ठेवून आणि आपल्या जिभा हातांत धरून इतकीं वर्षे पहात बसावी लागली आहे ! म्हणून म्हणतों,

काशीबाई, तुझी ही करुण किंकाळी साऱ्या देशाला आणि साऱ्या जगाला ऐकूं येऊं दे ! या तुझ्या किंकाळीमधून एकादा भीम, एकादा अर्जुन, एकादा पृथ्वीराज किंवा एकादा शिवाजी जर पुन्हा या देशांत निर्माण होऊं शकला तर तोच-तोच तुझी आणि आपल्या मायभूमीची अब्रू आणि प्राण वांचवूं शकेल ! साऱ्या जगासमोर एका पुण्यशील माऊलीला नागवीउघडी करून बेअब्रू करणाऱ्या 'दुःशासनांना आणि 'इंगवल्यांना' तोच खरें शासन करूं शकेल ! या अभागी देशाला स्वतंत्र करण्याचें सामर्थ्य काशीबाई, केवळ तुझ्याच ह्या करुण किंकाळींत आहे !

———

## ये, स्वातंत्र्या ये ! : : २

ये, स्वातंत्र्या ये ! इतकें दिवस तुझीच आम्ही वाट पहात होतो. शतकेंच्या शतकें आणि वर्षेच्या वर्षे तुझ्याच मंगल चरणाकडे डोळे लावून आम्ही बसलों होतो. इतकें दिवस तुझ्याच नांवाचा आम्ही जप करीत होतों. इतक्या रात्रीं तुझ्याच नांवानें घरांत बसून आम्ही आक्रोश करीत होतों. आम्हांला सोडून तूं इतकीं वर्षे कोठें दडी मारून बसला होतास बरें ? जगामधल्या अनेक देशांना आणि लोकांना शतकानुशतकें तुझें दर्शन मनसोक्तपणें घडत असतांना, आम्हांलाच तेवढा तुझा सुंदर चेहरा पहायला मिळूं नये याचें आम्हाला आश्चर्य वाटत होतें. गेल्या दीडशें दोनशें वर्षांत एकदां देखील तुला आमची आठवण येऊं नये: असा कोणता अपराध आम्ही तुझा केला होता बरें ? जगांतल्या अत्यंत दरिद्री आणि नापिक देशावर तुझी कृपा असावी आणि 'सुवर्णभूमि' म्हणून ज्या आमच्या देशाची हजारों वर्षे त्रिखंडांत कीर्ति दुमदुमत आहे त्या भारतवर्षावर मात्र तुझी अवकृपा असावी, हे चमत्कारिक नाहीं काय ? दुसऱ्यांच्या देशाचा आणि वित्ताचा अपहार करणाऱ्या क्रूर आणि जुलमी लोकांना तुझा आश्रय असावा आणि सारें विश्व आपलें कुटुंब आहे असें समजून साऱ्या मानवतेला आपल्या घराचे दरवाजे उघडे ठेवणाऱ्या आमच्यासारख्या सज्जन आणि पापभीरू लोकांवर मात्र इतकीं वर्षे तुझें कृपाछत्र असूं नये हें अद्भुत नव्हें काय ? आम्हाला वाटतें. जबरदस्ताचें तुला भय वाटतें म्हणूनच तूं त्यांची मनधरणी करीत असावास आणि आमच्यासारख्या गरीब लोकांची तुला पर्वा वाटत नाहीं म्हणूनच इतकीं वर्षे तूं आमच्याकडे ढुंकून पहात नसावास. हजारों वर्षांपासून साऱ्या जगाचें लक्ष एकट्या या

आमच्याच देशावर खिळून बसलें असतांना तुझेंच तेवढें लक्ष आमच्याकडे असूं नये याबद्दल राहून राहून आम्हांला दुःख होत होतें. जगामध्यें कोणत्याहि देशांत आजपर्यंत कधीं होऊन गेले नाहींत असे मोठमोठे ऋषी, साधू आणि वीर आमच्यामध्यें होऊन गेले असतांना तुला आमच्या देशाचें आकर्षण कां वाटूं नये बरें ? हिमालयाची बर्फाच्छादित शिखरें पहाण्यासाठीं, गंगा नदीच्या पवित्र जळांत अवगाहन करण्याकरितां, किंवा काश्मीरमधल्या गुलाबांच्या वाटिकेंत विहार करणाऱ्या हेतूनें तरी तूं एकादे वेळीं या देशाकडे चक्कर मारशील अशी आमची अपेक्षा होती. तुझ्या वाटेकडे डोळे लावून लावून आणि तुझ्या नांवाच्या धांवण्या धावून धावून आम्ही अगदीं कंटाळून गेलों होतो रे ! आम्हांला वाटलें कीं आतां कांहीं तूं येत नाहींस. लोकमान्य टिळक तर कंटाळून कंटाळून निघून गेले. ते म्हणाले, " आमच्या आयुष्यांत कांहीं आम्हांला हें स्वातंत्र्य पहावयाला मिळत नाहीं. " आम्हांला देखील असेंच वाटलें होतें, कीं तुझी आणि आमची गांठभेट आतां कांहीं आमच्या या जन्मामध्यें होत नाहीं. पण अखेर शेवटीं तुला आमची दया आली आणि तूं आज आलास. ये, स्वातंत्र्या ये. आम्ही तुझें स्वागत करतों.

ये स्वातंत्र्या ये. जवळ ये. अगदीं जवळ ये. असा तिऱ्हाइतासारखा दूर उभा राहूं नकोस. इथले सगळे अनोळखी चेहरे बघून तूं जरा गोंधळून गेला असशील, बिचकून गेला असशील. गांगरून गेला असशील. आमच्या देशामधलें कोणीच तुझ्या ओळखीचें नाहीं. म्हणून कदाचित् तुला चुकल्यासारखें वाटेल. पण थोड्याच दिवसांत तुझी आणि आमची चांगली गट्टी होईल. आणि मग तुला आमच्याबरोबर करमायला लागेल. तसें आम्ही तुझें निस्सीम भक्त आहोंत रे. आमच्या हृदयाला कान लावून आंतले ठोके ऐक. बघ, प्रत्येक ठोका तुझ्या नांवाची घोकणी घोकतो आहे कीं नाहीं. ही आमच्या हाताची नाडी बघ. तुझ्या दर्शनासाठीं उतावीळ होऊन पहा कशी उड्या मारते आहे ती. ह्या आमच्या अंगाला हात लाव. कढत लागते आहे ना तुला तें ! पहा, तुझ्या स्वागतासाठीं आमचें रक्त आंत कसें उसळ्या मारतें आहे तें. म्हणून म्हणतो जवळ ये. असा लांब उभा राहूं नकोस. आम्हांला तुला कडकडून भेटूं दे. आम्हांला तुला डोळे भरून नीट बघूं दे !

डोळयांत अश्रु भरून आल्यामुळें तुझें तेजस्वी मुखकमल आम्हांला नीट दिसत नाहीं. आजपर्यंत तुझी आम्ही पुस्तकामध्यें नुसती वर्णनेंच वाचीत होतो. तुझ्या जादूचीं काव्यें, तुझ्या सामर्थ्याचीं स्तोत्रें आणि तुझ्या पराक्रमाचे पोवाडे आम्हीं नुसतें तोंडानेंच म्हणत होतो. दूरदूरच्या देशाचे लोक तुझ्या गोड गोड गोष्टी आम्हांला सांगत होते. पण तुझा चेहरा प्रत्यक्ष असा कधींच आम्हांला पहावयाला मिळाला नव्हता. त्यामुळें आम्हांला अशी काळजी वाटत होती कीं, तूं आल्याबरोबर आम्ही तुला नीट ओळखूं कां नाहीं ? नाहीं तर तूं अचानक यायचास आणि आम्ही तुला न ओळखतां तसेंच दारांत मख्खासारखें उभे रहावयाचे. आणि मग तूं आमच्यावर रागावून तसाच माघारीं निघून जायचास. पूर्वीची ओळख नसली म्हणजे होते माणसाच्या हातून अशी चूक. दुसरेंहि एक भय आम्हांला असें वाटत होतें कीं, तुझी आमची पहिली ओळख नसल्यानें भलतेंच कोणी तरी तुझें नांव घेऊन आमच्या घरांत शिरावयाचें आणि आम्हांला फसवून निघून जायचें. आम्हीं आपली सरळ साधीं भोळीं माणसें. कोणीही आमच्या देशांत यावें आणि आम्हांला फसवून जावें, असा आजपर्यंतचा इतिहास आहे. पण तूं आलास. अगदीं नक्की आलास. आम्हीं तुला ओळखलें, म्हणून म्हणतों जवळ ये. तुझा सुंदर चेहरा अगदीं जवळून आम्हांला नीट न्याहळून बघूं दे.

ये स्वातंत्र्या ये. तुझें कोणत्या शब्दांनीं आणि कसें स्वागत करावें हेंच मुळीं आम्हांला कळत नाहीं. बोलून चालून आमचा देश खेड्यांचा. आम्हीं आपले अडाणी गांवढळ लोक. तुझ्यासारख्या थोर पाहुण्यांचा सत्कार कसा करावा हें आम्हांला कसें माहित असणार ? म्हणून आम्हीं करीत असलेल्या तुझ्या स्वागतांत जर कुठें उणेपणा राहिला तर त्याबद्दल तूं आम्हांला क्षमा कर. आणि आम्हांला संभाळून घे. तुझ्या स्वागतासाठीं बघ हे राष्ट्रीय झेंडे कसे घराघरावर लोकांनीं उभारलेले आहेत. तुझ्या सन्मानासाठीं तिरंगी निशाणाच्या ह्या माळा बघ कशा साऱ्या रस्त्यावर फडकत आहेत त्या. तुझ्या स्वागतासाठीं चौकाचौकांतून आणि मोहल्यामधून लतावृक्षांच्या आणि पानांच्या हिरव्यागार सुंदर कमानी पहा कशा बांधून ठेवलेल्या आहेत त्या ! तुझ्या स्वागतासाठीं देशामधलें कोटयवधि लोक आज तयार होऊन बसलेले आहेत. तुला रथावर बसवून तुझी

वाजत गाजत मिरवणूक काढावी कां तुला अंगाखांद्यावर आणि डोक्यावर गणपतिबाप्पाप्रमाणें घेऊन मिरवीत मिरवीत आम्हीं न्यावें, हेंच आम्हांला कळत नाहीं. तूं आल्यामुळें आम्हांला किती हर्ष झाला आहे म्हणून सांगूं. शेंकडों पाडवे किंवा दसरे आणि हजारों दिवाळ्या एकत्र होऊन आज आलेल्या आहेत असें आम्हांला वाटतें. असा सोन्याचा दिवस आमच्या आयुष्यांत उगवेल आणि तो आम्हांला आमच्या डोळ्यांनीं पहावयाला मिळेल असें कांहीं आम्हांला कधीं वाटलें नाहीं. आमच्या डोळ्यावर आमचा अजून विश्वासच बसत नाहीं. आम्हीं जागे नसून स्वप्नांत आहोंत असेंच आम्हांला वाटतें. स्वप्नच असेल तर केवढें हिमालयासारखें सुंदर गगनचुंबी आणि विशाल स्वप्न ! पण नाहीं, हें स्वप्न नाहीं. उलट आमच्या आतांपर्यंतच्या हजारों स्वप्नांचें हें साफल्य आहे. अनेक वर्षांच्या आमच्या मानसपूजेची ही पूर्तता आहे. खरेंच तूं आज आला आहेस. म्हणून म्हणतों, ये स्वातंत्र्या ये !

आतां मी म्हणालों कीं तुझ्या ओळखीचे चेहेरे इथें तुला दिसणार नाहींत. पण अगदींच तसें मात्र नव्हे बेरं कां. तुझ्या परिचयाचीं अनेक थोर थोर माणसें इथें आहेत. गांधीजींचा चेहरा तर तुझ्या चांगलाच ओळखीचा आहे ना? तुझी न् त्यांची चांगली दोन तपांची मैत्री आहे. जवाहरलाल नेहरूंना तूं उत्तम ओळखतोस हें आम्हांला ठाऊक आहे. अंदमानच्या तुरुंगांत वीर सावरकरांची आणि तुझी चांगली गट्टी जमलेली होती ही गोष्ट सर्वांना माहित आहे. आजपर्यंत अनेक वेळां तुला भेटून आलेले आणि प्रत्यहि तुला भेटणारे शेंकडों शूर लोक ह्या आमच्या देशामध्यें आहेत. त्यांची आतां तुला एकसारखी सोबत मिळेल. म्हणून तुला बुजल्यासारखें वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. ये. स्वातंत्र्या ये. अगदीं निर्धास्तपणें ये. भिऊं नकोस. आमच्याजवळ शस्त्रास्त्रें नाहींत किंवा आमच्याजवळ सामर्थ्य नाहीं म्हणून तुला आपल्या सुरक्षिततेबद्दल काळजी वाटत असली पाहिजे. तुझें रक्षण आणि तुझा सांभाळ आम्हीं दुबळे लोक कसा करूं ह्याबद्दल तुला चिंता वाटत असली पाहिजे. आम्हीं तें जाणून आहोंत. पण स्वातंत्र्या, त्याबद्दल तुला संशय बाळगण्याचें कारण नाहीं. अरे, तूं आल्यामुळें आतां हजारों हत्तींचे बळ आमच्या अंगांत आलें आहे. तुझ्या स्पर्शांत एवढी संजीवनी आहे कीं, त्यामुळें मुडदेसुद्धां जिवंत होऊन मोठया मोठया मर्दांप्रमाणें

पराक्रम करतात. मग काय तर? आजपर्यंत आम्हीं प्रेतासारखें जे पडून राहिलों होतों ह्याचें कारण आम्हांला सोडून गेला होतास! तुझ्यावांचून इतकीं वर्षे आम्ही जिवंत राहूं शकलों हाच मुळीं चमत्कार आहे. स्वातंत्र्या, अरे तूंच तर मुळीं राष्ट्राचा आणि देशाचा प्राण आहेस. आतां तूं आल्यानें वर्ष-सहा महिन्यांत बघ कसा आमच्या चेहऱ्यांत, शरीरांत आणि वागण्यांत एकदम फरक पडतो ते! वसंतऋतूंत झाडाला जशी नवीन पालवी फुटते आणि मोहर येतो, तसे तुझ्यामुळें देशांत कोट्यवधि जनतेला आतां नवीन जीवन मिळेल आणि त्यांच्या पराक्रमांना मोहर येईल! बालामृत पिऊन मुलें जशीं गुटगुटीत आणि बाळसेदार होतात तशी देशांतील कोट्यवधि जनता तुझ्या प्रेमाचें अमृत पिऊन धष्टपुष्ट होईल. एका वर्षाच्या आंत या देशाचा चेहरा जगाला ओळखतां यावयाचा नाहीं. एवढें या देशाचें स्वरूप तुझ्यामुळें बदलून जाईल हें लक्षांत ठेव. आम्हीं भांडखोर आहोंत. आम्ही दुधखुळें आहोंत. आम्हीं मूर्ख आहोंत अशी आजपर्यंत जगांत आमची बदनामी होत होती. ती तुझ्या कांनावर आलीच असेल. त्यामुळें तुझें आमच्याबद्दलचें मत कलुषित झालें असेल. पण खरें सांगूं स्वातंत्र्या, तूं नसल्याचा हा केवळ परिणाम होय! आतां तूं आला आहेस ना! पहा देशांतील सारी भांडणें आणि अज्ञान धूम ठोकून कशी पळून जातील तें. एका वर्षाच्या आंत सारा देश बृहस्पतीच्या बुद्धीनें विचार करूं लागेल आणि वाचस्पतीच्या जिभेनें बोलूं लागेल. तुला हें आम्हीं सांगायला पाहिजे असें नाहीं. हे सारे चमत्कार इतर देशांत तूं करून दाखविलेले आहेस. यांत तुला नवीन असें कांहींच नाहीं!

ये, स्वातंत्र्या ये. रात्रीचे बारा आतांच वाजत आहेत. ते ऐकलेस ना टोले? मग आतां तूं बाहेर कां उभा? ये. अगदीं आंत ये. आमच्या घरांत ये. आमच्या हृदयांत ये. आमच्या अंतःकरणांत ये. लोकमान्य टिळक सहा वर्षांची शिक्षा भोगून जसे रात्रीं बारा वाजतां आपल्या वाड्यांत परत आले, तसा दीडशें वर्षांच्या हद्दपारीनंतर तूं रात्रींच्या बारा वाजतां आमच्या घरीं येतो आहेस. तथापि, या मध्यरात्रीच्या वेळीं सारा देश तुझ्यासाठीं जागत बसलेला आहे. पाळण्यांतील अर्भकें देखील यावेळीं झोपलेलीं नाहींत. तीं डोळे उघडून टकाटका बघत बसलीं आहेत. एवढी काळीकुट्ट अंधारी ही रात्र. पण ती देखील दिवसाप्रमाणें नटून थटून तुझ्या स्वागतासाठीं अजून जागते आहे. अनेक जन्मांची आमची पुण्याई आज

फळाला आली आहे असें वाटतें. हा महान् भाग्याचा दिवस देशांत उगवावा म्हणून ज्या वीरांनीं आपल्या प्राणांच्या आहुति दिल्या ते वीर हा दिवस पाहण्यास आमच्यामध्यें आज हयात नाहींत म्हणून आम्हांला अतिशय दुःख होतें आहे. तुरुंगाच्या फरसबंदीवर ज्यांनीं आपलीं कपाळें आपटून आपटून रक्तबंबाळ केलीं, फांसाच्या दोरीमध्यें ज्यांनीं आपलीं मुंडकीं बेधडकपणें अडकवलीं आणि बंदुकीच्या गोळया छातीवर झेलून ज्यांनीं आपल्या देहाच्या चिंधडया उडवून घेतल्या, ते हजारो क्रांतिवीर हें स्वातंत्र्या, तुझें स्वागत करावयाला आज आमच्याबरोबर नाहींत ह्याचें आम्हांला वाईट वाटतें. म्हणून तुझें स्वागत करतां करतां त्यांची आठवण होऊन आमच्या डोळ्यामधून एकसारखें हें पाणी वहातें आहे. तूं आलास हा त्यांचा विजय आहे. त्यांच्या बलिदानाचें आणि तपःश्चर्येचें हें फळ आहे हें न ओळखण्याइतकें कां आम्हीं मूर्ख आहोंत ?

ये, स्वातंत्र्या ये. तुझ्या चरणावर मस्तक ठेवून आम्हीं तुला प्रेमानें वंदन करतों. आनंदानें नि हर्षानें आमचा ऊर आज भरून आला आहे. आम्हांला आतां जास्त बोलवत नाहीं. आणि बोलणार तरी काय आम्हीं? इतक्या वर्षांनीं तूं आलेला आहेस. नव्वद वर्षांपूर्वीं तूं येशील असें आम्हांला वाटले होतें. नानासाहेब पेशवे, झांशीची लक्ष्मीबाई आणि सेनापति तात्या टोपे ह्यांनीं तुझा हात धरून तुला घेऊन येण्याची त्यावेळीं प्रतिज्ञा केली होती. पण एकवीस दिवसांची चूक झाली. आणि तूं त्यांना गुंगारा देऊन पसार झालास. त्यानंतर सत्तावीस वर्षांपूर्वीं एका वर्षाच्या आंत तुला घेऊन येतों अशी गांधीजींनीं प्रतिज्ञा केली होती. पण त्याहि वेळीं तूं आमच्या हातावर तुरी दिलीस. गेल्या वर्षापासून तूं येणार असल्याच्या गोड गोड बातम्या आमच्या कानांवर एकसारख्या येत होत्या. त्या बातम्यांवर आमचा विश्वास बसत नव्हता. तूं येशील अशी आमची आम्हांला खात्री वाटत नव्हती. पण तूं अखेर शेवटीं आज आलास. कोणी म्हणतात कीं, तूं ज्या पूर्ण स्वरूपांत यावयास पाहिजे होतास त्या स्वरूपांत आलेला नाहींस ! तें कसें कां असेना, पण तूं आलास हें काय कमी झालें ? आतां मात्र आम्हीं तुला या देशांतून बाहेर जाऊं देणार नाहीं. आतां जगाच्या अंतापर्यंत तुला याच देशांत मुक्काम करून रहावें लागेल. देशांतील कोट्यवधि गरीब जनता आज आपलें बळ एकवटून

तुला पकडून ठेवल्यावांचून रहाणार नाहीं. देशांतले श्रीमंत आणि भांडवलवाले लोक तुला पैशाची लालूच दाखवून बिघडवून टाकण्याचा पुष्कळ संभव आहे. म्हणून स्वातंत्र्या, तुला त्या बाबत फार सावधपणानें रहावें लागेल. तूं गरीबांचा सवंगडी आहेस. तूं शेतकऱ्यांचा सोबती आहेस. तूं मजूरांचा मित्र आहेस. त्यांच्याच संगतींत ह्या देशामध्यें एकसारखें तुला रहावें लागेल. तुझ्या रक्षणासाठीं तें आपल्या छातीचे कोट करून तुझ्या भोंवतीं उभें रहातील हें ध्यानांत धर, म्हणून म्हणतों, ये स्वातंत्र्या ये. तुझ्या पवित्र नांवाचा मुक्तकंठानें जयजयकार करून आम्ही हर्षभरानें आज तुझें स्वागत करतों !

---

## महाराष्ट्राच्या सम्राटाचें निर्याण !    :    :    ३

आपल्या सबंध हयातीमध्यें लोकांच्या मनाला तीव्र दुःख होईल असें तात्यासाहेबांनीं कांहीं केलें नाहीं. संयम आणि समतोल वृत्ति हें त्यांच्या स्वभावाचे विशेष गुण होते. अद्भुत किंवा चमत्कारिक कांहीं करून दाखविण्याकडे त्यांच्या मनांचा कल नसे. त्यांच्याबद्दल लोकांनीं ज्या ज्या म्हणून कांहीं अपेक्षा धरल्या त्या त्या त्यांनीं उत्तम प्रकारें पूर्ण केल्या. केळकरांच्या स्वाभाविक चांगुलपणावर लोकांचा विश्वास होता. त्यांच्या हातून सहसा गैर गोष्ट होणार नाहीं असा लोकांचा त्यांच्यावर भंरवसा होता. असें असतां त्यांच्या आयुष्यांत एकच गोष्ट वाईट घडली. एकच गोष्ट अनपेक्षित घडली. जनतेच्या मनाला तीव्र दुःखाचा धक्का देणारी एकच गोष्ट त्यांच्या आयुष्याच्या शेवटीं घडली. आणि ती म्हणजे त्यांचें मरण ! एवढ्या बाबतींत मात्र तात्यांनीं लोकांना चांगले चकविलें. अगदीं बनविलें म्हणानांत ! त्यांच्या मरणाची बातमी ऐकावयाची आपली तरी कांहीं तयारी नव्हती. कोणाचीहि तशीं कल्पना नव्हती. तात्यांची प्रकृति अतिशय निकोप होती. त्यांचें आरोग्यहि उत्तम होतें. उभा जन्म त्यांनीं श्रमांत आणि कामांत घालविला. तात्या कधीं आजारी आहेत, किंवा मोठ्या दुखण्यानं अंथरुणाला खिळून पडले आहेत, असें मी तर आजपर्यंत कधीं ऐकलें नाहीं. बहुतेक मोठमोठीं माणसें अधून मधून या ना त्या दुखण्यानें आजारी असल्याचें आपण ऐकतो. त्यांच्या प्रकृतिमानाच्या चढउताराची पत्रकेंहि वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध होतात. तसें तात्यांच्या बाबतींत आजपर्यंत कधीं झालेलें नाहीं. केव्हांहि त्यांना पहावें. त्यांच्या तोंडावरचे तें नेहमींचें तेज आणि त्यांचें मिष्कील हंसूं आणि तो त्यांचा उत्साह आपला सदोदित कायम असे. आपलें आरोग्य उत्तम राखण्यासाठीं

त्यांनीं विशेष श्रम किंवा काळजी घेतल्याचें मला माहित नाहीं. बहुतेक सर्व विषयांची त्यांना आवड असे. पण कोणात्याहि व्यायामाबद्दल त्यांना प्रेम असल्याचें मला कांहीं माहित नाहीं. त्यांना कसलेंहि व्यसन नव्हतें. कच्च्या शेंगाचे दाणे खाण्याचा फक्त त्यांना नाद होता, हें सर्वांना माहित आहे. त्याखेरीज ते कशाच्या 'आहारीं' गेल्याचें ऐकिवांत नाहीं. नाहीं म्हणावयाला दुपारचें जेवण झाल्यावर लागलेंच आर्धापाऊण तास वामकुक्षी घेण्याचें मात्र त्यांना विलक्षण वेड होतें. या बाबतींत त्यांनीं कधीं अपवाद केला नाहीं. किंवा कधीं कोणाच्या भीडेला भीक घातली नाहीं. एकदां खडकीच्या 'वनस्पति बागेंत' आमच्या 'शारदा मंदिरा'चें शिशिर भोजन होतें. त्या भोजनाला तात्या आले होते. बारा वाजण्याच्या सुमाराला जेवण झाले रे झाले कीं तात्या हात धुवून सरळ आपल्या मोटारींत बसले आणि घरीं जायला निघाले. मी धांवत त्यांच्या मोटारीजवळ गेलों व म्हणालों, "तात्यासाहेब, आतां मंडळींच्या गप्पांना खरा रंग भरणार आहे. तुम्ही जर जाल तर आमचा फार विरस होईल!" तेव्हां तात्या जरा चिडक्या स्वरांतच म्हणाले, "मी तुम्हांला आधीं सांगितलें होतें, कीं जेवण झाल्यावर एक क्षणभर सुद्धां इथें थांबणार नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरानें मला भीड घातली तरीं माझा परिपाठ मी मोडणार नाहीं." असें म्हणून तात्यांनीं सरळ आपली मोटार तेथून पिटाळली. दुसऱ्या एका प्रसंगी ते मला म्हणाले, "ही दुपारच्या अर्ध्या तासाची वामकुक्षी ही माझ्या उत्तम प्रकृतींची गुरुकिल्ली आहे." तात्यांचे शह्यात्तरावें वर्ष ऑगष्टच्या चोवीस तारखेस सुरू झालें होतें. तीन-चार महिन्यापूर्वींच मी त्यांच्या घरीं गेलों होतों. त्यावेळीं वार्धक्यामुळें त्यांच्या डोक्याच्या आकारांत फरक होत चालल्याचें एकदम माझ्या लक्षांत आलें. तथापि, एका कानानें कमी ऐकूं येऊं लागण्यापलिकडे विशेष गौणपणा असा मला त्यांच्या प्रकृतीमध्यें आढळून आला नाहीं. त्यांचा उत्साह आणि धांदल अगदीं पहिल्यासारखीच होती. मी म्हणालों, "तात्यासाहेब, बडोद्याचें महाराज आतां इथें आले आहेत, त्यांनीं तुम्हांला तीन वाजतां आपल्या बंगल्यावर भेटायला बोलाविलें आहे." तात्या चटकन उद्गारले, नेहमीपेक्षां जरा मोठ्यानेंच ते म्हणाले, "येतो. मी अडीच वाजतां येथें तयार आहे. तुम्ही गाडी घेऊन या." तात्यांचा तो उत्साह पाहून मी तर अगदीं

चकीत झालो. बरोबर अडीच वाजतां पोषाख करून तात्या माझी वाट पहात बसले होते. तात्यांच्या बरोबर दुसऱ्याहि पुण्यांतल्या एका वृद्ध कार्यकर्त्यांना मी महाराजांकडे बोलावलें होतें; पण ते गृहस्थ स्वतः तर आलेच नाहींत. उलट तात्यांच्यावर ते भडकून उठले. ते म्हणाले, "या तात्यांना आतां म्हातारचळ लागलेला आहे. कोणी वाटेल त्यांनीं त्यांना बोलाविलें तरी हा म्हातारा डोक्यावर पगडी घालून आणि खांद्यावर उपरणें घेऊन त्याला भेटायला आपल्या घरांतून तुरूतुरू धांवत जाईल!" मला ते उद्गार ऐकून हंसूं आलें नाहीं. उलट त्यामुळें तात्यांच्या स्वभावाचा एक निराळाच पैलू मला दृष्टीस पडल्यासारखें वाटलें. मूळचाच त्यांचा आनंदी आणि आशावादी स्वभाव. वयामुळें अधिक प्रेमळ आणि शीतळ झाल्याचें मला दिसून आलें. त्यांच्या बोलण्यामध्यें एक निराळाच आनंद त्यावेळीं माझ्या प्रत्ययाला आला. त्यांचा उत्साह अगदीं शीग भरून सांडत होता म्हणानात! ते महाराजांना म्हणाले, " महाराष्ट्राचा उठाव करण्याचें काम तुम्हीं आधीं हातीं घ्या. कोणाच्याहि हाताखालीं काम करण्याची माझी तयारी आहे." तात्यांची आणि आपली ही भेट शेवटची ठरणार आहे असें त्यावेळीं मला मुळींच वाटलें नाहीं. गेल्या दोन तीन महिन्यामध्यें त्यांचे एक व्याख्यान आणि दोन लेख माझ्या वाचण्यांत आले. हें व्याख्यान त्यांनीं एक ऑगष्ट रोजीं पुणें येथें भरलेल्या महाराष्ट्र कार्यकर्त्यांच्या बैठकींमध्यें केलेलें होतें. एक लेख पंधरा ऑगष्टच्या 'फ्री प्रेस' च्या स्वातंत्र्यमहोत्सवाच्या खास अंकांत आणि दुसरा लेख साप्ताहिक 'लोकमता' च्या दोन ऑक्टोबरच्या गांधीजयंतीच्या अंकांत त्यांनीं लिहिलेला होता. या तीनहि ठिकाणीं प्रकट केलेले त्यांचे विचार मला अतिशय तेजस्वी वाटले. काँग्रेसच्या राजकारणावरील तात्यांचीं मतें मला पूर्वी कधींहि आवडत नसत. त्या बाबतींत मी त्यांच्यावर अनेक वेळां टीका केली आहे. कित्येक वेळां वाजवीपेक्षां जास्तच कठोर टीका केली आहे असें मला वाटतें. तथापि, या तीन प्रसंगीं त्यांनीं जो अभिप्राय व्यक्त केला तो मात्र मला एकदम पटला. मी त्या वेळीं कोणाला तरी म्हणालों कीं, "तात्यांच्या बुद्धींत एक निराळेंच तेज निर्माण झाल्यासारखें मला अलिकडे दिसतें आहे." देशाला आज स्वातंत्र्य मिळालें आहे. तें काय वाटेल त

करून सांभाळायला पाहिजे. स्वातंत्र्याच्या रक्षणाचा आधीं विचार व्हायला पाहिजे. हा तात्यासाहेबांच्या अलिकडच्या विचारांचा मुख्य सूर होता. आणि तो अगदीं बरोबर होता. कँग्रेसनेत्यांच्या आजकालच्या वक्तव्यांत नेमका तेवढाच सूर आढळून येत नाहीं. बाकी सर्व असतें. मिळालेल्या स्वातंत्र्याचें रक्षण कसें करावयाचें याची देशाच्या पुढाऱ्यांना जणूं चिंताच नाहीं असें वाटतें. जनतेला सशस्त्र आणि सुसज्ज करण्याऐवजीं जनतेच्या जवळ असलेली मोडकीं तोडकीं हत्यारें गोळा करून गांधींच्या पायावर वहाण्याचें काम मात्र जोरांत सुरू आहे. म्हणून कँग्रेस नेत्यांच्या भूमिकेपेक्षां मला तात्यासाहेबांचीच भूमिका जास्त तर्कशुद्ध वाटली. तात्यांची बुद्धि इतक्या वयांतही अजून बिनचूक काम देते आहे हें बघून मला खरोखरच हर्ष झाला. म्हणूनच त्यांच्या आयुष्याची दोरी अशी अचानक तुटेल असा विचारही माझ्या मनाला कधीं शिवला नाहीं. गेल्या मंगळवारीं मी खंडाळ्याला होतों. अकरा वाजतां तात्या गेल्यांचा मला मुंबईहून फोन आला. माझा त्यांवर मुळीं विश्वासच बसेना. तसाच बाराच्या गाडीनें मी शिवाजीनगरला आलों. बंगल्याबाहेर लोकांची बरीच गर्दी जमली होती. कांहीं टांगे आणि मोटारी उभ्या होत्या. तात्यासाहेबांचें अंत्यदर्शन घेण्यासाठीं तरुण मुलांची आणि स्त्रियांची रीघ लागून राहिली होती. मुख्य दारासमोरच्या दालनांतच पलंगावर तात्यांचा देह ठेवण्यांत आला होता. आणि त्यांच्या सर्वांगावर शेवंतीच्या पिवळ्या फुलांच्या हारांची फारच मोठी रास पडलेली. एकाद्या तक्क्याला डोळे मिटून टेकून बसावेत ना, तसे तात्यासाहेब मला दिसले. त्यांचें शरीर निष्प्राण होऊन त्यावेळीं जवळ जवळ सात आठ तास तरी झाले होतें; पण मृत्यूचें एवढेंसेंसुद्धां चिन्ह त्यांच्या चेहेऱ्यावर दिसत नव्हतें. त्यांचा तो सतेज गौरवर्ण, त्यांचें तें भव्य मोठें डोकें आणि त्यांचा तो रुबाबदार गंभीर चेहरा अगदीं होता तसा दिसत होता. ओठ तर अशा थाटांत मिटलेले मला दिसले कीं, जणूं कांहीं आतां डोळे उघडून ते बोलायला सुरवात करणार आहेत किंवा काय कोणास ठाऊक. मी नामदार गोखले यांचें शव पाहिलें होतें. मृत्यूनंतरहि त्यांचा चेहरा सतेज दिसत होता. तथापि, तात्यासाहेबांच्या इतका तो खचित सुंदर आणि आकर्षक दिसत नव्हता. खरोखर, तात्यांनीं मरणावरहि शेवटीं मात केली. जीवनामधल्या

निरनिराळ्या प्रसंगांना आणि संकटांना त्यांनीं जसें शांतपणें व हंसून तोंड दिलें तसेंच त्यांनीं मृत्यूचेंहि सस्मित मुखानें स्वागत केलें. काळपुरुष जेव्हां मंगळवारीं पहांटे त्यांना घेऊन जाण्यासाठीं चोरासारखा लपत छपत आला असेल, तेव्हां ते शांतपणें आपल्या अंथरुणावर घोरत पडलेले पाहून त्याची चांगलीच फजिती उडाली असेल. निराशेनें मटकन् तो एकदम खालींच बसला असेल. आपल्या दर्शनानें माणसांचे चेहेरे भयभीत आणि भेसूर झालेले पाहण्याची मृत्यूला नेहमीं संवय झालेली, पण आपण आलों तरी हा महापुरुष निर्विकारपणें झोपीं गेलेला पाहून मृत्यूला अगदीं मेल्याहून अधिक मेल्यासारखें झालें असेल. मरणाला मारलें, हा तात्यासाहेबांनीं आयुष्याच्या शेवटीं मिळवलेला फारच मोठा विजय होय, यांत मुळींच शंका नाहीं. मृत्यूच्या भेसूरपणाचा डंखच मुळीं तात्यासाहेबांनीं उखडून काढला. त्यामुळें एक अद्‌भुत गोष्ट मात्र साध्य झाली. ती हीं कीं, त्यांच्या मरणाच्या आकस्मिकतेमुळें लोकांना आश्चर्य वाटलें. दुःख झालें. पण त्यांच्या यातना मात्र जाणवल्या नाहींत. तात्यासाहेब आणखी जगले असतें तर तें कोणाला नको होतें ? पण आयुष्यांतलें प्रचंड जीवितकार्य पुरे झाल्यानंतर अत्यंत सुखाचें मरण त्यांना आलें, या समाधानाच्या भावनेमुळें त्यांच्या वियोगाचें दुःख लोकांना असह्य वाटलें नाहीं. त्यामुळेंच त्यांच्या प्रेतयात्रेमध्यें एकप्रकारचें पवित्र आणि शांतगंभीर वातावरण पसरलें होतें. त्यांच्या अंत्यदर्शनासाठीं सारें पुणें शहर जमलें होतें. खरोखरच केळकर महाराष्ट्रसम्राट् होतें. आणि म्हणून एकाद्या सम्राटाप्रमाणेंच ते आपल्या राजधानींतून मिरवीत मिरवीत इहलोकांमधून निघून गेलें. प्रेमाचा आणि फुलांचा पुणें शहरानें त्यांच्यावर अक्षरशः पाऊस पाडला. त्यांच्या अंत्यसंस्कारासाठीं स्मशानांत नदीच्या दोन्ही कांठावर मिळून एक लाख लोक तरी जमलें होते. पुण्याच्या स्मशानांत मृताच्या गौरवाचीं भाषणें ध्वनिक्षेपकावरुन होण्याची ही पहिलीच वेळ होय.

स्मशानांत निश्चेष्ट पडलेली ती केळकरांची शांत मूर्ति पाहून तीस पस्तीस वर्षांच्या त्यांच्या कित्त्येक आठवणींचा डोंगरच्या डोंगर माझ्या डोळ्यासमोर उभा राहिला. मी अकरा सालीं पुण्यांत रहावयास आलों. तेव्हांपासून आतांपर्यंत त्यांचें महान् जीवन मी एकसारखें पहातोंच आहे. त्यांचें कर्तृत्व एवढें विविध अन् विस्तीर्ण आहे आणि त्यांचें वाङ्मय इतकें विशाल आहे

कीं, त्यांचें नुसतें वर्णन करावयाचें म्हटलें तरीं महाभारताएवढा मोठा ग्रंथ होईल. मी माझ्या पिढींतल्या पुण्यामधल्या लोकांना नेहमींच भाग्यशाली समजतों. जें महाराष्ट्रांत इतर कोणालाहि पहावयाला मिळालें नसेल तें त्या वेळच्या आम्हां पुण्यामधील लोकांना विनासायासानें बघावयाला आणि ऐकावयाला सांपडलें. राजकारणाच्या नकाशांत पुण्याला लोकमान्य टिळकांनीं अद्वितीय स्थान प्राप्त करून दिलें होतें. लोकमान्य जरी त्याकाळीं कारागृहांत होते तरी साऱ्या देशाचे डोळे पुण्याकडे लागून राहिले होते. 'पुणें बोले, आणि महाराष्ट्र डोले' अशीच केवळ त्या काळची स्थिति नसून 'पुणें बोले आणि हिंदुस्तान हाले' असें त्यावेळचें पुण्यामधलें वातावरण होतें. पुणें हें त्यावेळीं देशाच्या राजकारणाचें तीर्थक्षेत्र आणि मराठी वाङ्मयाचें विद्यापीठ होऊन बसलें होतें. टिळकांच्या नांवाच्या मोहिनीनें देशांतले मोठमोठे पुढारी आणि वक्ते पुण्याकडे आकर्षिले जात होते. महाराष्ट्रांतले मोठमोठे कार्यकर्ते वेळोवेळीं पुणें शहरामध्यें येऊन जात होते, त्यामुळें पुणें हें व्याख्यानाचें आणि राजकीय प्रचाराचें एक महान् क्षेत्रच होऊन बसलें होतें. त्या काळांत ज्ञानाच्या गंगेचें स्रोत पुण्याच्या रहिवाशांवर एकसारखें कोसळत होते. म्हणून त्यावेळीं पुणें शहरामध्यें नुसतें रहाणें देखील भाग्याचें झालें होतें. 'केसरी' तेव्हां महाराष्ट्राचा प्राण होता. आणि त्यामुळें गायकवाडवाड्यांत वावरणाऱ्या व्यक्तींना आणि घडणाऱ्या गोष्टींना एक अद्‌भुत महत्व प्राप्त झालें होतें. टिळकांच्या गैरहजेरींत त्यांच्या राजकारणाची ध्वजा वर फडकत ठेवण्याची जबाबदारी नरसिंह चिंतामण केळकर आणि कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर या टिळकांच्या दोन तरुण पट्टशिष्यांवर येऊन पडलेली होती. त्यावेळीं केळकर हे नुसतेच नरसोपंत होते, तात्यासाहेब नव्हते. आणि खाडिलकर हे साधे कृष्णाजीपंत होते, काकासाहेब झालेले नव्हते. दोघांचीहि वयें चाळीशीच्या आंत होती. दोघांच्याहि कर्तृत्वाबद्दल महाराष्ट्राला आशा वाटूं लागली होती. तथापि, दोघांची तुलनाच केल्यास केळकरांपेक्षां खाडिलकरांबद्दल लोकांस जास्त आदर वाटत होता. मात्र याचें कारण खाडिलकरांचें राजकारण नसून त्यांची लोकप्रिय झालेली नाटकेंच होत, हें सांगणें जरूर आहे. सरकारच्या रोषास पात्र झालेल्या 'कीचकवधा' मुळें खाडीलकरांचें नांव केळकरांपेक्षां जास्त माहित

## लोकमान्य टिळकांचें पुण्यस्मरण : : ५

आणखी चार दिवसांनीं लोकमान्य टिळकांना जाऊन सव्वीस वर्षे पूर्ण होतात. आम्ही ज्या काळांत जन्माला आलों त्या काळांत टिळकांपेक्षां मोठा पुरुष ह्या देशांत दुसरा कुणीच नव्हता. महाराष्ट्रांतल्या या महापुरुषाचें नांव त्यावेळीं साऱ्या हिंदुस्थानमध्यें दुमदुमत होतें. महाराष्ट्रांतल्या प्रत्येक माणसाला टिळकांच्या नांवाचा तेव्हां केवढा अभिमान वाटत होता म्हणतां! स्वातंत्र्यासाठीं आपल्या सर्वस्वाची आहुति करणाऱ्या शिवरायाच्या महाराष्ट्राची ती महान् परंपरा टिळकांनीं पुनः सुरू केली, आणि स्वातंत्र्याच्या लढ्याचें नेतृत्व महाराष्ट्राला मिळवून दिलें. मराठ्यांचें राज्य बुडाल्यानंतर हिंदुस्थानच्या इतिहासांत महाराष्ट्राला एवढें मानाचें स्थान पहिल्यानेंच मिळालें. क्रांतिकारक चैतन्याची प्रचंड लाट त्यावेळीं महाराष्ट्रांत उसळली आणि त्या लाटांचे कंप साऱ्या देशामध्यें उमटले. दर मंगळवारीं पुण्यामध्यें टिळकांच्या 'केसरी' नें आरोळी ठोकली कीं, देशामधील साऱ्या स्वातंत्र्यप्रेमी तरुणांचीं काळजें हर्षानें नाचूं लागत, तर त्या गर्जनेमुळें तिकडे लंडनमध्यें ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या छातीमध्यें भीतीचा थरकांप उडत असे. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ही भाषा बोलायला प्रथम टिळकांनीं देशाला शिकविलें आणि त्या हक्कासाठीं ब्रिटिश सरकारशीं छातीठोकपणें टक्कर देणाऱ्या निर्भय कार्यकर्त्यांची आघाडी कॉंग्रेसमध्यें प्रथम टिळकांनीं उत्पन्न केली. टिळकांच्या या लोकोत्तर कर्तृत्वामुळें देशाच्या राजकारणांत पुण्याला आणि महाराष्ट्राला त्यावेळीं केवढें वैभव प्राप्त झालेलें होतें! साऱ्या हिंदुस्थानचें—नव्हे साऱ्या जगाचें—लक्ष त्यावेळीं पुण्यामधल्या ह्या श्यामल वर्णाच्या चित्पावन ब्राह्मणाकडे लागून राहिलें होतें!



श्रीशिवछत्रपति आणि थोरले बाजीराव यांच्यानंतर दोनशें वर्षे महाराष्ट्रामध्यें महापुरुष असा निर्माणच झाला नव्हता. ह्या काळामध्यें महाराष्ट्र हा नांवानेंच नुसता 'महा' राहिला होता; आणि लघुप्रकृतीचीं माणसें त्याच्या मोठेपणाचें वाटोळें करण्याचें काम मोठ्या झपाट्यानें करीत होती. तें काम अठराशें अठरा सालीं बाळाजीपंत नातूंनीं पूर्ण केलें. आणि महाराष्ट्राचें स्वातंत्र्य धुळीला मिळालें. इंग्रजी भाषेची आणि विचाराची राजवट महाराष्ट्रांत यथाकाल सुरू झाली. नंतर साहेबाच्या संस्कृतीच्या आणि ज्ञानाच्या नव्या नवलाईनें महाराष्ट्राच्या पहिल्या दोन पिढ्यांची बुद्धि अगदीं दिपून गेली—भांबावून गेली. त्यामुळें परावलंबीपणाचें एक जाड आणि अमंगळ शेवाळेंच जणूं काय महाराष्ट्राच्या बुद्धीवर जमा होऊन बसल्यासारखें झालें. ती बौद्धिक ग्लानी आणि मानसिक सुस्ती झुगारून देऊन तिसरी पिढी मात्र खडबडून जागी झाली. आणि आपलें डोळे किलेकिले करून देशाच्या दुःस्थितीचा विचार करूं लागली. या तिसऱ्या पिढींत महाराष्ट्रामध्यें महापुरुषांचें एक भलें मोठें पीकच उगवलें. रानडे, तेलंग, चिपळूणकर, आगरकर, टिळक, गोखले अशीं एकपेक्षांहि एक कर्तृत्वानें, बुद्धिमत्तेनें आणि विद्वत्तेनें जबरदस्त माणसें त्यावेळीं महाराष्ट्रांत जन्माला आलीं. हीं माणसें कसलीं! हे एकेक राक्षस होते राक्षस. इकडचें जग तिकडे फेंकून देण्याची ताकद होती एकेकाच्या मनगटांत. अलौकिक बुद्धिमत्तेचा एवढा श्रीमंत हंगाम महाराष्ट्रांत पूर्वी पिकलेला नव्हता. तथापि, त्या काळांतल्या सर्व महापुरुषांपेक्षां टिळकांच्या बुद्धीचा पल्ला आणि पराक्रमाची झेप फारच मोठीं होती. म्हणून साऱ्या हिंदुस्थानचें लक्ष महाराष्ट्राकडे एकटे टिळकच खेचूं शकले! महाराष्ट्र हें महान् राष्ट्र आहे हे शिवप्रभूनंतर आणि थोरल्या बाजीरावानंतर टिळकांनीं पुन्हा सिद्ध करून दाखविलें.



टिळकांच्या भाविक आख्यायिकांनीं आणि दैवी दंतकथांनीं दुमदुमलेल्या काळामध्यें आमची भाग्यशाली पिढी जन्माला आली. आम्हांला कळूं लागायच्या आधींच राम आणि कृष्णाप्रमाणें टिळक हे देशाच्या देवघरामध्यें जाऊन बसलेले होते. घरोघर लाल, बाल आणि पाल ह्या स्वातंत्र्याच्या नव्या दत्तात्रयाच्या तसबिरी लटकत होत्या. हिंदमातेच्या गळयांत लोंबणाऱ्या रत्नमाळेच्या तळवटी बा.

गं. टि.' हा कौस्तुभमणी होऊन विराजत होता. त्यावेळच्या सार्वजनिक गणेशोत्सवांत तर खुद्द गजाननापेक्षां टिळकांच्या नांवाचा जयजयकार जास्त होत होता. 'हिंदमाता' आणि 'बाळ' यावांचून त्यावेळच्या कवींना कविता रचायला दुसरा विषयच सुचत नव्हता. 'लोकमान्य टिळक महाराज की जय!' ही जागृत महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याची एक आरोळी होऊन बसली होती. महाराष्ट्राला फार वर्षांनीं एवढा लोकोत्तर पुढारी लाभलेला होता. म्हणून त्याला कुठें ठेवूं आणि कुठें नको ठेवूं, त्याचे कोणकोणते गुण किती किती आणि कसे कसे आठवूं, असें महाराष्ट्राला होऊन गेलेलें होतें. टिळकांचें स्वरूप, टिळकांचें चारित्र्य, टिळकांचें कर्तृत्व, टिळकांची विद्वत्ता, टिळकांची निर्भयता आणि टिळकांचा पराक्रम यायध्यें दोष काढावयाला एवढीशीसुद्धां जागा नव्हती. म्हणून त्यांच्या नांवाभोंवती आणि मूर्तीभोंवतीं अद्‍भुततेचें दैवी वर्तुळ चमकत असलेलें जनतेला दिसूं लागलें. टिळकांची सुपारी, टिळकांचा वाडा, टिळकांचा छापखाना, टिळकांची पगडी, टिळकांचा सोटा, टिळकांचा 'केसरी', एवढेंच काय पण टिळकांच्या बैठकींतलीं किंवा त्यांच्या आजूबाजूला वावरणारी सर्वच माणसें महाराष्ट्राला त्यावेळीं अद्‍भुतरम्य वाटूं लागलीं.



टिळकांच्या हयातींत जनतेमधल्या अडाणी शाहिरांनी त्यांच्यावर पोवाडे रचून ठेवले. पुण्याला शनिवारवाड्यासमोर जुन्या मंडईत मी त्यांचा एक पोवाडा त्यावेळीं कितीतरी वेळां ऐकत होतों. इंग्लंडच्या बादशहाकडे सातासमुद्रापलिकडच्या एका राजाचा एक 'कागुद' आला. हा 'कागुद' जो वाचून दाखवील त्याला जगाचें राज्य म्हणे मिळायचें होतें. बादशहानें हा कागद आपल्या दरबारांतल्या मोठमोठ्या सरदारांना आणि शहाण्या माणसांना वाचून दाखवायला सांगितला; पण त्यांतलें एक अक्षरदेखील कोणाला वाचतां येईना! इंग्लंडचा बादशहा अगदीं हवालदील होऊन गेला. जगाचें राज्य आपल्या हातून जाणार असें त्याला भय वाटलें. इतक्यांत त्याला कोणी सांगितलें कीं, तो कागद वाचून दाखवणारा एकच मनुष्य जगामध्यें आहे आणि तो पुण्यांत राहत असतो. त्याबरोबर बादशहाला अतिशय आनंद झाला. त्यानें ताबडतोब टिळकांना आमंत्रण पाठविलें.—

" आवतान आलं
पुन्याच्या बामनाला;
बामन पगडी
घालूनशान उठला,
म्हनला जाऊन येतों
जरा इलायतेला;
गला पाच्छायच्या
दरबाराला;
पाच्छानें कागुद
हातीं तेच्या दिला !
म्हनला वाचून
दाव रे बामना याला !
टिळकानीं कागुद
हातामंदीं घेतला;
अन् मनांत धांवा
शिवबाचा केला !
शिवबा, आतां तूंच रे
आमच्या रक्षणाला !
मंग कागुद
समोर त्येनीं धरला
अन् असा घडा घडा घडा
वाचून दावला !
—जीरे जी—जीरे—जी—जीरं.... "

—४—

अशी सूरभरणी सुरू करतांना डफावर कडाडून थाप मारून एक पायावर शाहिर जेव्हां गिरकी घेत असे, तेव्हां भोंवतालचे भाविक आणि अडाणी श्रोते टाळ्यांचा कडकडाट करीत असत. त्यामध्यें एकादादुसरा पांढरपेशा सुशिक्षित श्रोता उभा असला, तर अडाणी लोकांची टिळकावरची आंधळी भक्ति बघून त्याच्या डोळ्यांमध्यें अश्रू उभे राहात आणि पायांपासून डोक्यापर्यंत हर्षाचा थरारून काटा उभा राही ! हा अनुभव तिथें उभा राहून अनेक वेळां मीं घेतलेला आहे !



टिळकांच्या लेखनामुळें, भाषणामुळें आणि निरनिराळ्या राजकीय चळवळीं-मुळें महाराष्ट्रामध्यें त्यावेळीं अद्‌भुतरम्यतेचें एक विलक्षण वातावरण पसरलेलें होतें. हरि नारायण आपट्यांच्या ऐतिहासिक शिवकालीन कादंबऱ्या त्यावेळीं अति-शयच लोकप्रिय होत्या. त्या कादंबऱ्यांनीं अप्रत्यक्षपणें या अद्‌भुतरम्यतेमध्यें आणखीनच भर घालून ठेविली. गोविंद कवीच्या काव्यांनीं, सावरकरांच्या पोवा-ड्यांनीं, सन्मित्रसमाज मेळ्याच्या गाण्यांनीं आणि खाडिलकरांच्या पौराणिक आणि ऐतिहासिक नाटकांनीं महाराष्ट्रांतल्या या अद्‌भुतरम्य भावनेमध्यें इतकीं गुर्मी आणि मस्ती निर्माण करून ठेवली कीं, त्यावेळीं महाराष्ट्रामध्यें प्रत्येक जाणत्या आणि नेणत्या माणसाला आपण एकाद्या कादंबरीच्या किंवा नाटकाच्या सृष्टी-मधूनच वावरतो आहोंत किंवा काय असें वाटत असे. रोज कोणातरी गोऱ्या अधिकाऱ्याचा कोठें तरी खून होत असे, कोणीतरी फांसावर जात असे किंवा तुरुंगात जात असे. असें कांहीं घडलें कीं डोकीं भडकून जात असत आणि रक्त उसळ्या मारूं लागे. ' बॉंब ' ही काय वस्तु आहे हे त्यावेळींच प्रथम लोकांना कळलें. अमुकजण आमक्या ठिकाणीं ' बॉंब ' तयार करीत आहे, तमुकजणानें तमक्या ठिकाणीं पिस्तूल लपवून ठेवले आहे, फलाण्याच्या मागे ' सी. आय. डी. ' चीं माणसें फिरताहेत अशा गोष्टी एकसारख्या त्यावेळीं कानावर येत. कोण गुप्त पोलिसांत आहे आणि कोण नाहीं हें त्यावेळीं कळणें अशक्य असल्यानें महाराष्ट्रांतल्या प्रत्येक माणसाच्या मनामध्यें एक गोड अस्वस्थता निर्माण झालेली होती. घरोघर जो तो दारें बंद करून देशांतल्या राजकीय चळवळीबद्दल कानगोष्टी करीत होता. रँडसाहेबाचा खून, चाफेकर बंधूंचा पराक्रम, खुन्या मुरलीधराजवळ साडेनवाच्या तोफेच्या धडाक्यात

केलेला फितूर द्रविडाचा खून, नाशिक येथें भर थिएटरांत जॅक्सन साहेबांना गोळी घालणारा कान्हेरे आणि हिंदी क्रांतीची लाट विलायतेपर्यंत पोहोंचविणारे सावरकर यांच्याखेरीज बोलायला महाराष्ट्राला त्यावेळीं दुसरा विषयच नव्हता. या साहसाचा किंवा अत्याचाराचा आणि टिळकांचा वस्तुतः कांहींच संबंध नव्हता. तथापि, राष्ट्रांत त्यावेळीं उठलेल्या क्रांतिकारक तरुणांचें स्फूर्ति दैवत टिळकच आहेत, असें जनता मानीत होती. खरोखर त्यावेळीं महाराष्ट्रांत जन्माला येणें हें एक भाग्य होते !



१९०८ सालीं टिळकांना सहा वर्षांची जेव्हां शिक्षा झाली तेव्हां ज्याला दुःखाचा जबर धक्का बसला नाहीं असा त्यावेळीं महाराष्ट्रांत एकहि माणूस नव्हता. टिळकांच्या या शिक्षेचें सुतक ज्यानें पाळलें नाही असें एकहि घर त्यावेळीं महाराष्ट्रांत नसेल. हरताळ पाळणें किंवा संप पुकारणें हें शास्त्र त्यावेळीं कोणालाही माहित नव्हते. विद्यार्थ्यांमध्यें त्यावेळीं कसलीहि संघटना नव्हती. तथापि, ज्या दिवशीं ती शिक्षा झाली त्या दिवशीं मुलें शाळेंत गेलीं नाहींत. विद्यार्थी कॉलेजांत गेले नाहींत. तेवढ्यासाठीं दुसऱ्या दिवशीं त्यांनी मास्तरांच्या छड्या खाल्ल्या. कांहींनीं तर आपल्या शाळाकॉलेजांमधून आपली कायमची हकाल-पट्टी करून घेतली. टिळकांच्या सहा वर्षांच्या शिक्षेच्या मुदतीमध्यें कोणी साखर खायची सोडली, कोणी चहा सोडला. कोणी अनवाणी पायांनीं चालावयाचें ठरविलें आणि जमिनीवर नुसती घोंगडी अंथरून तिच्यावर झोंपण्याची प्रतिज्ञा केली. टिळकांवर महाराष्ट्राचें जेवढें प्रेम होतें तेवढें अलिकडच्या काळामध्यें दुसऱ्या कोणत्यहि पुढाऱ्यावर महाराष्ट्रानें प्रेम केलेलें नाही. राम वनवासामध्यें गेल्यानंतर भरत ज्याप्रमाणें चौदा वर्षे त्याच्या पादुका पूजित होता, त्याप्रमाणें टिळक सहा वर्षे मंडालेच्या तुरुंगांत असतांना महाराष्ट्रानें टिळक भक्तीच्या पादुका अत्यंत भक्तिभावानें उराशीं ठेविल्या आणि जतन केल्या !



१७ जून १९१४ रोजीं ऐन मध्यरात्रीं सरकारनें टिळकांना पुण्यांत त्यांच्या गायकवाड वाड्यामध्यें आणून सोडलें. एकाद्या कादंबरीमध्यें किंवा एकाद्या नाट-

कांत घडावी तशीच गोष्ट घडली. खरेंच मोठ्या माणसांचीं चरित्रें हीं एखाद्या थोर नाटककरानें लिहिलेल्या उत्कृष्ट नाटकाप्रमाणेंच आपोआप व्यवस्थितपणें घडलीं जातात असें ऑस्कर वाईल्डनें 'येशू ख्रिस्तांच्या' चरित्राबद्दल जें म्हटलें आहे तें शिवाजी महाराजांच्या आणि टिळकांच्या चरित्रालाहि लागूं पडतें. टिळक ज्या दिवशीं सुटून घरीं आलें, त्यावेळीं मी पुण्यांतच होतो. तोपर्यंत टिळकांना आम्हीं प्रत्यक्ष असें पाहिलें नव्हतें, तेव्हां टिळकांचें समोरासमोर दर्शन घेणें आणि त्यांना डोळे भरून पहाणे हें पुण्यांतील त्यावेळच्या आम्हां विद्यार्थ्यांना एक वेडच लागून राहिलें होतें. गायकवाडवाड्यामध्यें प्रवेश करण्याची आमची छातीच नव्हती. वाड्याबाहेर गुप्त पोलिसांचा पहारा असतो, आंत जो कोणी जाईल त्याचें नांव ते टिपून घेतात, अशाहि बातम्या त्यावेळीं पुष्कळ पसरल्या होत्या. गायकवाड वाड्यावरून इकडून तिकडे उगाच फेऱ्या मारतांना आणि कुठें एखाद्या उघड्या खिडकीमधून टिळकांचा चेहरा आपल्या नजरेस पडेल कीं काय, अशा भावनेनें वर पहातांना त्यावेळीं मनांत अशा कांहीं गोड उकळ्या फुटत असत, तें कांहीं सांगतां येत नाही. त्यानंतर पुढच्या चार पांच वर्षांमध्यें टिळकांना आम्ही अनेक वेळां पाहिलें. जवळून पाहिलें. लांबून पाहिलें. अगदीं त्यांच्या शेजारीं बसून पाहिलें. (एकदां तर त्यांच्या उपरण्याचें एक टोंक क्षणभर मी स्वतः हातांत धरून देखील पाहिलें!) त्यांचीं अनेक व्याख्यानें ऐकलीं. त्यांच्या मिरवणुकींत सामील झालों. किंबहुना राजकीय कीर्तीच्या अगदीं कळसाला ते पोहोंचलें असतांना त्यांचे सारे वैभव आणि थाटमाट आम्हांला मनसोक्त पहावयाला मिळाला. टिळकांचे वक्तृत्व म्हणजे खरोखरच गर्जना होती. टिळक बोलत नसत; ते गर्जत असत. ते गडगडत असत. आवेशाच्या भरांत त्यांचे उघडझांप करणारे ते रागीट डोळे, त्यांच्या ओठावरच्या हालणाऱ्या त्या मिशा आणि भावना अनावर झाल्यामुळे त्यांचा तो थरथरणारा जबरदस्त जबडा बघून मला नेहमीं 'केसरी' वरच्या सिंहाची आठवण होई. टिळकांच्या चेहेऱ्यामध्यें आणि सिंहाच्या चेहेऱ्यामध्यें कांहींतरी साम्य असल्याचा भास अजूनहि मला होतो. टिळकांचें एक एक वाक्य कानीं पडलें म्हणजे काळजावर कोणीतरी घणाचे घाव घालते आहे असें वाटे! दण-दण दण-दण! ऐकणारा बसल्या जागेवर अगदीं दबकून जाई! इकडून तिकडे

ढळण्याचीसुद्धां त्याची छाती नसे. छे, छे, छे, महाराष्ट्राच्या सार्वजनीक जीवनांत एवढा जबरदस्त माणूस पुन्हा पहावयाला मिळावयाचा नाहीं!



इंग्लंडला जाण्यापूर्वी त्यांना निरोप द्यावयाला पुण्याच्या मंडईत जी प्रचंड सभा भरली होती ती मी पाहिलेली आहे. इंग्लंडहून परत आल्यानंतर पुण्याच्या रस्त्यामधून त्यांची जी थाटामाटांत मिरवणूक निघाली ती मी बघितली आहे. गोखले वारले तेव्हां त्यांच्या स्मशानयात्रेसाठीं मुद्दाम सिंहगडावरून येऊन ओंकारेश्वराच्या स्मशानामध्यें त्यांनीं केलेलें हृदयस्पर्शी भाषण मीं ऐकलेलें आहे. गायकवाडवाड्यांत त्यांच्या सत्काराचे अनेक निरनिराळे लहानमोठे प्रसंग मी दारांवाटींत बसून अवलोकिलेले आहेत. आणि--शेवटीं--मुंबई येथें वीस सालच्या एक ऑगस्ट रोजीं रात्रीं पाऊण वाजतां सरदारगृहांत जेव्हां त्यांचें प्राणोत्क्रमण झालें त्यावेळीं समोर खालीं रस्त्यावरच्या अंधारांत पावसांत भिजत असलेला जो हजारों लोकांचा निःस्तब्ध समुदाय उभा होता. त्यामध्यें मीहि एक होतों. आणि त्या वहांटेपासून तों त्या दिवशीं संध्याकाळीं साडेसहाच्या सुमारास चौपाटीच्या वाळवंटावर त्यांच्या देहाला अग्निसंस्कार मिळेपर्यंत मी त्यांच्यापासून फारसा दूर नव्हतों. टिळकांच्या विराट् स्मशानयात्रेमध्यें सारी मुंबई सामील झाली होती. डोक्यावर धो धो मुसळधार पाऊस पडत असतांना लक्षावधी लोक दुःखानें माना खालीं घालून उघड्या डोळयांनीं त्यांच्यामागून चालले होते. टिळकांची स्मशानयात्रा ज्यानें पाहिलेली आहे तो तें दृश्य जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. त्यांच्या स्मशानयात्रेमध्यें चालण्याचें पुण्य ज्याच्या गांठीं पडलेलें आहे. त्याला तें पुण्य दहावीस वर्षे तरी खास उपयोगी पडले !



ज्या दिवशीं लोकमान्य टिळक वारले त्याच दिवशीं रात्रीं मुंबई येथें महात्मा गांधी यांनीं असहकारितेची घोषणा केली. हा योगायोगहि विलक्षण नाट्यपूर्णच म्हटला पाहिजे. देशाच्या रंगभूमीवरून एक महान् विभूति पडद्याआड जावी आणि दुसऱ्या महान् विभूतीनें त्याच क्षणीं त्या रंगभूमीवर प्रवेश करावा तसें तें झालें. लोकमान्य टिळकांचें कार्य जेथें संपलें, तेथें महात्मा गांधीचें कार्य सुरू झालें

असें अच्युतराव कोल्हटकर जें म्हणत असत तें अगदीं खरें आहे. लोकमान्य टिळक जर आज ह्यात असते तर (ते नव्वद वर्षांचे असते ही गोष्ट विसरू-नहि) आजच्या राजकारणांत त्यांनीं कोणती भूमिका घेतली असती हा वाद निर्माण करणें निरर्थक आहे. सबंध रामायण ऐकूनहि सीता ही रामाची कोण हें विचारणें जितकें मूर्खपणाचें आहे तितकेंच टिळकांचें सबंध चरित्र बघून आणि कर्तृत्व ऐकून आज ते राजकारणामध्यें कुठें असते हें विचारणेंहि मूर्खपणाचें आहे. टिळक आणि गांधी यांचा स्वभावधर्म एकमेकांपासून अगदीं निराळा होता. टिळक हे बुद्धिप्रधान तर गांधी हे भावनाप्रधान. टिळक हे कर्कश आणि कठोर तर्कपंडीत, तर गांधी हे श्रद्धेचे कान 'आंतल्या आवाजा' कडे देऊन बसलेले. ब्रिटिशांच्या न्यायावर आणि कायद्यावर टिळकांचा पूर्ण विश्वास, तर गांधींचा त्यांच्यावर यत्किंचितही विश्वास नाहीं. इंग्रजांशीं भांडून आणि झगडून जनतेनें आपले हक्क त्यांच्याकडून हिसकावून घेतले पाहिजेत हें टिळकांचें राजकारण, तर त्या सैतानी सरकारशी जनतेनें असहकार करून त्याला शरण आणलें पाहिजे हें गांधींचें राजकारण. 'शठं प्रति शाठ्यम्' या मार्गाचा राजकारणांत अवलंब केला पाहिजे असें टिळक म्हणत, तर 'सत्य आणि अहिंसा' यांजवरच राजकारणाचें अधिष्ठान असलें पाहिजे असें गांधी म्हणत. पण याचा अर्थ असा मुळींच नव्हे कीं कसल्याहि असत्याच्या आणि हिंसेच्या साधनानें आपलें साध्य हस्तगत करणें हीं गोष्ट टिळकांना पसंत होती. दहशतवादी हिंसेचा मार्ग टिळकांना मुळींच पसंत नव्हता. आणि गांधीप्रमाणेंच टिळकांच्या राजकारणाचें अधिष्ठानहि शंभर टक्के सत्यावरच होतें.



टिळक आणि गांधी ह्यांच्या विचार करण्याच्या पद्धतींत आणि जीवन-विषयक तत्त्वज्ञानांत कितीहि मौलिक फरक असला तरी त्या दोघांच्या राज-कारणामध्यें विरोधस्थळांपेक्षां साम्यस्थळेंच अधिक होतीं. कॉंग्रेस ह्या संस्थेबद्दल दोघांचीहि निष्ठा अढळ होती. हिंदु-मुसलमानांचें ऐक्य घडवून आणण्यासाठीं मुसलमानांना वाटेल त्या सवलती दिल्या पाहिजेत असें गांधीप्रमाणेंच टिळकां-चेंहि मत होतें. टिळकांचें स्वदेशीचें वेड गांधींच्या खादीइतकेंच जबरदस्त होतें. आणि मद्यपानबंदीबद्दल दोघांनाहि मनामधून विलक्षण निकड वाटत

होती. भगवद्गीतेकडे बघण्याचे दोघांचे दृष्टिकोण जरी भिन्न असले तरी दोघांचेंहि जीवन गीतेच्या तत्वज्ञानावरच आधारलेलें होतें. कमीजास्त फरकानें दोघांमध्यें एवढें सामर्थ्य असूनहि, **संपूर्ण स्वातंत्र्य मिळेपर्यंत ब्रिटिशांशीं एकसारखे झगडत रहावयाचें, कोणत्याहि कारणानें त्यांच्या आहारीं जाऊन किंवा त्यांचा मिंधेपणा पत्करून त्यांच्याशीं तडजोड करावयाची नाहीं, यामध्यें टिळक आणि गांधी ह्यांच्यांत विलक्षण एकवाक्यता होती.** मिळेल तें खिशांत टाकायचें आणि पुढच्यासाठीं भांडायचें, ही टिळकांच्या प्रतियोगी सहकारितेची व्याख्या होती. याचा असा अर्थ नाहीं की, टिळकांना असहकार मान्य नव्हता. टिळकांचा 'बहिष्कार' आणि गांधींचा 'असहकार' याच्यांत मूलतः कांहींच फरक नाहीं. सरकारवर 'बहिष्कार' घातल्यावांचून किंवा सरकारशीं कांहीं बाबतींत 'असहकार' केल्यावांचून जनतेच्या पदरांत कांहींहि पडणार नाहीं, हें टिळक ओळखून होते. पंचवीस वर्षे असहकाराची आणि कायदेभंगाची सतत चळवळ करून ब्रिटिश सरकारच्या या देशांतील राज्यकारभाराची चौकट कॉंग्रेसनें खिळखिळी करून टाकल्यानंतर आतां टिळकांच्या 'प्रतियोगी सहकारिते'चे तत्त्व तिनें उघडपणें स्वीकारलेलें आहे, यावरून आज टिळक असते तर ते कॉंग्रेसमध्येच असते आणि अगदीं गांधीजींच्या बरोबरच असते, ही गोष्ट उघड आहे. म्हणून टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या राजकारणाचे खरे वारसदार महात्मा गांधी आणि कॉंग्रेसच ठरतात.



टिळकांच्या मागें त्यांच्या गादीवर श्री. तात्यासाहेब केळकर बसले असें समजण्यांत येतें. कारण 'केसरी-मराठा' या संस्थेचीं सारीं सूत्रें, स्वराज्य मिळविण्यासाठी टिळकांनीं जमवून ठेवलेले सारे फंड आणि गायकवाड वाड्यांतील एकंदर सर्व कारभार त्यांच्यानंतर केळकरांच्या ताब्यांत गेला. टिळकांची 'कायदेशीर' आणि नैतिक वारसदारी केळकरांनीं गेली पंचवीस-सव्वीस वर्षे महाराष्ट्रामध्यें कशी चालविली हा इतिहास सर्वांना माहितच आहे. पुन्हा तो अप्रिय कथाभाग उगाळीत बसण्याचें कारण नाहीं 'साहित्यसम्राट् केळकरां-' बद्दल मला स्वतःला आदर वाटतो. मराठी साहित्याची केळकरांनीं केलेली सेवा

अमर आहे असे माझें मत आहे. त्यांच्या बुद्धिमत्तेचा, प्रतिभेचा, प्रसादाचा आणि व्यासंगाचा साहित्यसेवक आणखी शंभर वर्षे तरी या महाराष्ट्रामध्यें पुन्हां निर्माण होणार नाहीं असें मी निश्चयानें सांगतो. त्यांच्या लेखनाच्या आणि भाषणाच्या अनेक मेजवान्या अनेकदां आम्ही चाखलेल्या आहेत आणि आमच्या प्रतिभेला त्यांजवर पोसलेलेंहि पण आहे. इतका नितांत आदर त्यांच्या साहित्याबद्दल मनांत बाळगून त्यांच्या राजकीय जीवनावर आणि कर्तृत्वावर कठोर शब्दामध्यें वारंवार टीका करतांना माझ्या मनाला नेहमींच यातना होत असतात, पण त्याला कांहीं इलाज नाहीं. टिळकांच्या राजकारणाचा जबाबदार वारसा पत्करून त्याला असें केविलवाणें स्वरूप केळकरांनीं जर दिलें नसतें तर त्यांच्यावर टीका करण्याचा हा अप्रिय प्रसंग आमच्यावर कधींहि आला नसता !



केळकर हे साहित्यांत सम्राट् आणि राजकारणांत विदूषक आहेत. टिळकांच्या अंगचें धैर्य आणि बेडरपणा केळकरांत नाहीं. संकटाला टक्कर देण्याची आणि हालअपेष्टांचें हालाहल पचविण्याची केळकरांची छाती नाहीं. केळकर हे स्वभावतःचे भित्रे आहेत. त्यांचा 'सुवर्णमध्य' वाद आणि 'समेटवाद' हा त्यांनीं आपल्या भित्रेपणाला बाहेरून दिलेला तात्त्विक मुलामा आहे. 'हेंहि खरें आणि तेंहि खरें' असें केळकरांच्या तत्त्वज्ञानाला जे हास्यास्पद स्वरूप आज महाराष्ट्रांत प्राप्त झालें आहे, त्याचे कारण केळकरांचा हा भित्रेपणा होय ! टिळकांच्या विचाराची बैठक नेहमीं अढळ आणि ठाम असे. हा टिळकांचा गुण केळकरांनीं औषधापुरतादेखील उचललेला नाहीं. केळकरांच्या ह्या भिडस्त आणि पोकळ स्वभावामुळें त्यांनीं स्वातंत्र्याच्या र जकारणामध्यें आपली विलक्षण कुतरओढ करून घेतली. गांधींच्या असहकारितेच्या लोंढ्यांत ते आरंभी फरपटत गेले. आणि मागाहून असहकारितेच्या पोरकट कुरापती काढावयाला त्यांनीं सुरवात केली. 'फेरवाल्या' बरोबर त्यांनीं फेर धरून पाहिला; पण कॉंग्रेसमध्यें त्यांचा जीव रमेना; कोणाशींहि त्यांचे पटेना आणि कॉंग्रेसच्या बाहेर पाऊल टाकण्याची त्यांची छातीहि होईना. एकोणतीस सालीं लखनौ येथें संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास झाल्यानंतर, एक कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटींत तरी रहा,

नाहीं तर मध्यवर्ति कायदेमंडळांत तरी रहा, असें पंडित जवाहरलाल नेहरूंनी त्यांना बजावलें, तेव्हां वर्किंग कमिटीचाच केळकरांनीं राजीनामा देऊन टाकला. तथापि, तीस सालचा कायदेभंग सुरू झाल्यावर त्यांचा जीव आंतबाहेर घोटाळूं लागला. तुरुंगांत जाण्याचा निश्चय करून ते सिमल्याहून पेणला पळत पळत गेले आणि तेथें त्यांनीं कसलातरी कायदेभंग केला! पण सरकारनें त्यांना पकडलें नाहीं. पुनः पुण्याला येऊन त्यांनीं मीठ तयार केलें आणि आक्षिप्त वाङ्मयहि वाचून दाखविलें. तरी देखील सरकार त्यांच्या मानगुटीवर हात ठेवीना! तेव्हां मग निराश होऊन तुरुंगांत जाण्याचा त्यांनीं नाद सोडला. पुढें त्यांचा हा वकूब ओळखून दुसऱ्या राऊंड टेबल परिषदेला त्यांना सरकारनेंच आमंत्रण दिलें; तेव्हां कॉंग्रेसच्या नांवानें आंघोळ करून आणि हिंदुसभेचें प्रतिनिधित्व राजरोस-पणें पत्करून ते विलायतेला गेले. तेव्हांपासून राजकारणामधून ते जवळ जवळ उठल्यासारखेच झाले! सार्वजनिक आयुष्याचा संन्यास घेण्याचें केळकरांनी अनेक वेळां सोंग केलें. पण राजकारणांतल्या पराभवाची खवखव एकसारखी त्यांच्या मनाला आंतून डांचत असल्यामुळें ते अनेक वेळां आपलें सोंग झुगारून देऊन मूळ स्वरूपांत प्रकट होत असत.



मित्रपणाच्या जोडीला केळकरांच्या अंगांत मत्सर आणि खुनशीपणा हे दोन अत्यंत वाईट दुर्गुण आहेत. टिळकांच्या मृत्यूनंतर गांधींच्या आणि केळकरांच्या राजकीय जीवनाला बरोबरच सुरवात झाली. पण पंचवीस वर्षांत गांधी हे आंतर-राष्ट्रीय कीर्तीच्या कळसावर चढून बसले आहेत, तर केळकर हे होते तेथेंच, म्हणजे गायकवाड्यांतच, अद्यापि घोटाळताहेत. केळकरांना महात्मा गांधींचें अत्यंत वैषम्य वाटतें. महात्माजींची निंदा करण्याची एकहि संधि केळकरांनीं आतांपर्यंत घालविली नाहीं. एवढेंच नव्हे तर राष्ट्रमाता कस्तुरबा गांधी यांच्या स्मारकनिधीला महाराष्ट्रानें पैचीहि मदत करूं नये असें पत्रहि प्रसिद्ध करून केळकरांनीं आपल्या गांधीद्वेषाची आणि क्षुद्र स्वभावाची अगदीं पराकाष्ठा करून दाखविली. वैयक्तिक गांधीद्वेषाचा आणि कॉंग्रेस निंदेचा घाणेरडा वारसा हिंदु-महासभेला केळकरांनींच देऊन ठेवलेला आहे. सदतीस सालापासून सावरकरांना हातीं धरून व त्यांना पुढें करून त्यांच्या हातून गांधींना आणि कॉंग्रेसला ठेव-

ण्याचा खुनशी प्रयत्न केळकरांनीं पुनः एकदां जोरानें करून पाहिला. ' केसरी ' पत्रानें सारें बळ वेठीला लावून हिंदुमहासभेचा एकखांबी सावरकरी तंबू पुन्हा महाराष्ट्रांत उभा करण्याची केळकरांनीं अगदीं कोशिस करून पाहिली. पण परवांच्या कायदेमंडळाच्या निवडणुकीमध्यें हिंदुसभेचा हा पोकळ डोलारा सपशेल कोसळून पडला आणि कायमचा धुळीला मिळाला. देशाच्या राजकारणांत आज हिंदुमहासभेला मरावें लागलेलें हें शोचनीय मरण केळकरांना डोळ्यांनीं पहा-वयाला मिळालें, ही फार उत्तम गोष्ट झाली. केळकरांना ही त्यांच्या आयुष्यांत चांगलीच अद्दल घडली. हिंदुसभेला देशाच्या राजकारणांत जें वैधव्य प्राप्त झालें आहे आणि कायदेमंडळाच्या निवडणुकींत तिचें जें वपन झालेलें आहे त्याला केवळ केळकरांचा कॉंग्रेस द्वेषच जबाबदार आहे.



तपस्वी बाबासाहेब परांजपे विनोदानें म्हणत असत कीं, केळकर हे लोकमान्य टिळकांची विधवा होत ! टिळकांची मालमत्ता आणि इस्टेट फक्त त्यांच्यामागें त्यांनीं संभाळली. दुसरें कांहीं केलें नाहीं ! केळकरांचें हें वर्णन अगदीं यथा-योग्य आहे. केळकरांनीं टिळकांचा छापखाना संभाळला असेल, त्यांचा वाडा संभाळला असेल, त्यांचे फंडहि कदाचित् संभाळले असतील, आणि ' केसरी ' पत्राचा खपहि संभाळला असेल ! पण ह्याच्या पलीकडे केळकरांनीं टिळकांचें कांहींएक संभाळलें नाही ! ' केसरी ' पत्राला हिंदुमहासभेचें मुखपत्र बनवून टिळकांच्या राजकारणाचा त्यांनीं ' गृह्यसंस्कार ' लिहिला ! देशाच्या स्वातंत्र्यासाठीं दर मंगळवारीं गर्जना करणाऱ्या टिळकांच्या बंडखोर ' केसरी 'च्या जबड्याभोंवतीं हिंदुमहासभेचे जाळीदार मुकटे आणि कुबट धाबळ्या गुंडाळून त्यांनीं या टिळकांच्या सिंहाला सदाशिव पेठेंतल्या एकाद्या लुकड्या ग्रामसिंहाची कळा आणून दिली. महात्मा गांधींच्या आणि कॉंग्रेसच्या क्रांति-कारक राजकारणाला, तात्या सावरकर आणि तात्या करंदीकर यांना हातीं धरून, या तात्या केळकरांनीं विरोध केला. एवंच, लोकमान्यांच्या राजकारणाची या तीन तात्यांनीं करकचून ताटी आवळली. तथापि, त्या कामांत त्यांना यश आलें नाहीं ! टिळकांचें राजकारण देशामध्यें महात्मा गांधींनीं आणि कॉंग्रेसनें जिवंत ठेवलें, स्यातंत्र्याच्या इतिहासांत लोकमान्यांचें कर्तृत्व अमर आहे. म्हणून एक ऑगस्ट एकोणिसशें शेहेचाळीस रोजीं सारा हिंदुस्थान देश लोकमान्य टिळकांच्या नांवाचा एकमुखानें जयजयकार करील ! बोला, ' लोकमान्य टिळक महाराजकी जय !

## 'कमला' काव्याचा कलावंत गेला! : : ६

'बी' या अद्भुतरम्य नांवानें गेलीं तीस बत्तीस वर्षें मराठी कवितेच्या रसिकांना सुपरिचित असलेले महाराष्ट्राचे एक अत्यंत प्रतिभाशाली कवि श्री. नारायण मुरलीधर गुप्ते हे शुक्रवार दि. २९ ऑगस्ट रोजीं दिवंगत झाले, हें कळविण्यास आम्हांला अत्यंत दुःख होत आहे. रे. टिळक, तांबे, चंद्रशेखर, लेंभे, गोविंदाग्रज, रेंदाळकर, नागेश आणि बालकवि ठोमरे ह्यांच्या काळांतील 'बी' हे नामांकित कवि होते. आजच्या काळांतहि नव्या दमाचे आणि उज्वल प्रतिभेचें अनेक नव-नवीन तरुण कवि उदयाला आलेले असले, तरी 'बी' कविच्या तोलाचा आणि दर्जाचा त्यामध्यें एकहि कवि आढळणार नाहीं हें सत्य आहे. 'बी' कवींच्या निधनानें मराठी कवितेचे फारच मोठें नुकसान झालेलें आहे यांत मुळींच शंका नाहीं. 'बी' कवींना ओळखणारी अशीं माणसें महाराष्ट्रांत फारच थोडीं निघतील. सार्वजनिक जीवनामध्यें त्यांनीं कधींहि भाग घेतला नाहीं. स्वतःच्या काव्याला किंवा नांवाला चारचौघांत प्रसिद्धि मिळावी अशी त्यांनीं कधीहि हांव धरली नाहीं. त्यांचा सारा जन्म लहान सहान गांवांत सरकारी नोकरी करण्यांत गेला. कोण-त्याहि कवींच्या मेळाव्यांत किंवा साहित्यसंमेलनांत त्यांनीं कधीं भाग घेतलेला नाहीं. आपल्या मधुर गुंजारवानें त्यांनीं महाराष्ट्राला जेव्हां वेडें केलें तेव्हां देखील आपल्या नांवनिशीचा किंवा ठावठिकाणाचा त्यांनीं कोणाला पत्ता लागूं दिला नाहीं. आजहि 'बी' कवींना जे ओळखतात त्यांना त्यांचें संपूर्ण नांव काय आहे हें देखील सांगतां येणार नाहीं. आपलें लौकिक अस्तित्व जगापासून इतक्या कटाक्षानें लपवून ठेवणारा 'बी' एवढा महान् कवि महाराष्ट्रामध्यें आजपर्यंत दुसरा कोणीहि होऊन गेला नाहीं. गोविंदाग्रजांना भेटण्यासाठीं एकदा ते आपण होऊन पुण्याला आले होते एवढीच त्यांच्या प्रकटीकरणाची एक गोष्ट

नला माहित आहे. मरणासमयीं त्यांचें वय शहात्तर वर्षांचें होतें. गेलीं सात आठ वर्षें ते मध्यप्रांतांत छिंदवाडा येथें आपल्या जांवयाच्या घरांत राहात असत. आयुष्याच्या अखेरी अखेरीस ते अतिशय थकलेले होते. त्यांना डोळयांनीं नीट दिसत नव्हतें. तथापि, अशा अवस्थेंतहि त्यांची काव्यप्रतिभा त्यांना सोडून गेली नव्हती. दगडी पाटीवर मोठ्या मोठ्या अक्षरांमध्यें आपल्या लहान नातवांकडून ते आपल्या कविता लिहवून घेत. अगदीं गेल्या मे महिन्या-पर्यंत त्यांचें हें काव्यलेखन चालू होतें. त्यांनीं अलिकडे लिहिलेल्या कांहीं कविता 'युगवाणी' मासिकांत प्रसिद्ध झालेल्या पुष्कळांनीं वाचल्याहि असतील.



मराठी काव्याच्या प्रांगणांत 'बी' कवींनीं 'वेडगाणें' ही कविता लिहून पदार्पण केलें. त्याची आठवण अजूनहि माझ्या मनांत जागी आहे. 'बी' हें इंग्रजी नांव धारण करून मराठी कविता लिहिणारा हा कवि कोण आहे याबद्दल रसिकांना जेवढें आश्चर्य आणि कौतुक वाटलें, त्यापेक्षांहि त्यांनीं लिहिलेली ही पहिलीच हृदयंगम कविता वाचून त्यांचीं अंतःकरणें अधिक हर्षित झाली. क्षितिजावर उगवल्याबरोबरच एखाद्या तेजाळ तार्‍यानें आपल्या किरणांनीं लोकांचीं मनें आकर्षून घ्यावींत, तसें 'बी' कवींनीं आपल्या पहिल्याच गुंजनानें लोकांचीं मनें आणि समकालिन कवींचें लक्ष आपल्याकडे एकदम वेधून घेतलें. रे. टिळकांसारखा कविश्रेष्ठ तर 'बी' कवींवर इतका खूष होऊन गेला कीं त्यानें 'बी' कवींना उद्देशून एक अतिशय सुंदर कविता लिहिली. 'बी' कवींच्या बहुतेक सर्व कविता त्यावेळच्या मासिक 'मनोरंजन' मध्यें प्रसिद्ध झाल्या. संख्येच्या मानानें आणि इतर कवींच्या तुलनेनें त्यांच्या कविता अतिशय थोड्या आहेत. ते फारच थोडें लिहित. पण जें लिहित त्यांतील अक्षरन्‌अक्षर शब्दन् शब्द बावनकशी सोनें असे. 'बी' कवि जेव्हां कविता प्रसिद्ध करूं लागले, तो मराठी कवितेच्या ऐन बहारीचा काळ होता. गोविंदाग्रज, ठोमरे, रेंदाळकर, तांबे आणि नागेश यांच्या एकाहिपेक्षां एक सुंदर कविता त्यावेळीं प्रसिद्ध होऊं लागल्या होत्या. गोविंदाग्रजांच्या आणि बालकवि ठोमर्‍यांच्या कवितांनीं तर रसिकांना वेडच लावलें होतें. अशा बिकट चढाओढीच्या कालामध्यें एखाद्या नव्या कवीनें प्रकट होऊन वाचकांच्या मनावर आपली स्वतंत्र छाप बसवणें हें

अतिशय कठिण होतें. पण तें अवघड काम 'बी' कवींनीं सहज लीलेनें करून दाखवलें. तसे 'बी' कवि आपल्या समकालिनांपेक्षां त्यावेळीं वयानें कांहीं लहान नव्हते. गडकऱ्यांपेक्षां तेराचौदा वर्षांनीं ते मोठे होते. त्यांचा व्यासंग आणि चिंतन दुसऱ्या कोणत्याहि कवीपेक्षां कमी नव्हतें. मराठी भाषेवर तर 'बी' कवींचें विलक्षण प्रभुत्व होतें. 'बी' कवीइतकी सोपी, सुंदर आणि सोज्वळ मराठी भाषा त्यांच्या पिढींतल्या तुल्यबळ समकालिनांना देखील साधली नाहीं. गडकऱ्यांच्या लिखाणांतला कृत्रिम नटवेपणा 'बी' कवींच्या काव्यांत आढळून येत नाहीं. चंद्रशेखर आणि लेंभे यांची संस्कृतप्रचुरता 'बी' मध्यें सांपडणार नाहीं. 'बी' कवींची कविता अस्सल मराठी ढंगाची आणि वळणाची होती. तांबे आणि बालकवी यांचें काव्य सोपें आणि सुबोध होतें हें खरें. पण 'बी' च्या कवितेचा अभिजात डौल त्यांच्या काव्यांत दिसून येत नाहीं. 'बी' कवींच्या शैलीला परंपरा आहे. जुन्या मराठी संत कवींच्या अभंगादाङ्मयाचा आणि जातिवंत शाहीरांच्या लावण्यांचा व पोवाड्यांचा मार्मिक अभ्यास करून 'बी' कवींनीं आपली शब्दसंपदा कमावलेली होती. त्यांच्या कवितेमधली कोणतीहि एकादी ओळ जर घेतली तरी तिच्यांत असामान्य कलावंतांची सहजता आणि प्रभुत्व आढळून आल्यावांचून रहात नाहीं.



मराठी काव्यामधें 'बी' कवींचें स्थान अवघ्या दोनच कवितांनीं अढळ केलेलें आहे. या दोन कविता म्हणजे 'चांफा' आणि 'कमला'. 'चांफा बोलेना, चांफा हालेना, चांफा खंत करी, कांहीं केल्या फुलेना,' या अविस्मरणीय ओळींनीं सुरू झालेली 'बी' कवींची 'चांफा' ही कविता म्हणजे मराठी काव्याचें एक अमर भूषण आहे. 'बी' च्या 'कमलें' ला तर मराठी भाषेंमध्यें दुसरी तोडच नाहीं. ज्यांना 'बी' कवींच्या प्रतिभेचें सामर्थ्य समजावून घ्यावयाचें असेल त्यांनीं त्यांची ही एकच कविता वाचावी आणि वाचून तोंडपाठ करावी. मी स्वतः गेलीं तीस वर्षें 'बी' कवींची ही 'कमला' कविता स्वतःशीं गुणगुणतों आहें. तरी देखील माझ्या मनावरची तिची मोहिनी अजून एवढीशी सुद्धां कमी झालेली नाहीं. 'कमला' काव्य हा कवीच्या प्रतिभेचा एक महान् चमत्कार आहे. अशा कविता प्रत्येक वाङ्मयामध्यें फारच थोड्या जन्माला येतात. जे कवि या

अद्‌भुत कविता लिहितात, त्यांना पुन्हा तशा कविता क्वचित्‌च लिहितां येतात. प्रतिभेच्या एका विशिष्ट समाधीच्या अवस्थेमध्यें अशा कवितांचा जन्म होतो. 'बी' कवि हे स्वभावतः चिंतनपर कवि होते. त्यांची बहुतेक कविता ही तात्विक आहे. काव्यामध्यें एकादी भावनापूर्ण गोष्ट सांगणें हा त्यांच्या प्रतिभेचा सहजस्वभाव नव्हे. असें असतां 'कमला' सारखी करुण रसानें ओथंबलेली कथात्मक कविता इतक्या उत्कृष्टपणें त्यांना कशी लिहितां आली ह्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें! साखरेचा कणन् कण जसा गोड असतो किंवा अमृताचा थेंबन् थेंब जसा मधुर असतो तशी 'कमला' काव्यांतली ओळन् ओळ, शब्दन् शब्द आणि अक्षरन् अक्षर अवीट माधुर्यानें रसरसलेलें आहे. त्या काव्याची रचना इतकी घोंसदार आणि चिरेबंदी आहे कीं, त्यामध्यें एक अक्षर इकडचें तिकडे फिरवतां येणार नाहीं. थोरातांच्या 'पाक' कुळांत जन्माला आलेली 'कमला' संभाजीची 'राख' होण्यापेक्षां मृत्यूच्या गळयांत माळ घालणें कसें पत्करते, हें एका बाणेदार मराठा मुलीचें तेजस्वी चित्र 'बी' कवींनीं आपल्या ओजस्वी लेखणीनें या कवितेंत रंगविलेलें आहे. ही कविता ज्यावेळीं प्रसिद्ध झाली त्यावेळीं तिच्या तेजानें साऱ्या महाराष्ट्राचे डोळे अक्षरशः दिपले. आणि अद्यापहि ही कविता जो कोणी वाचील तो तिच्या प्रभावानें स्तिमित झाल्यावांचून रहाणार नाहीं! एकेका मराठी कवीची एकेकच प्रतिनिधिक कविता निवडावयाचें ठरवल्यास गोविंदाग्रजांची 'राजहंस' किंवा बालकवींची 'फुलराणी' यांच्याबरोबर 'बी' कवींच्या 'कमले'चाहि अवश्य अंतर्भाव करावा लागेल.



'बी' कवींची सर्वच कविता सोज्वळ असली तरी ती सोपी नाहीं. त्यांचें काव्य रुक्ष किंवा क्लिष्ट असें कुठेंच नाहीं. तथापि तें कळावयास कुठें कुठें अवघड आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं. याचें कारण 'बी' कवि हे तत्त्वज्ञानी कवि होते. त्यांचा योगविद्येचा आणि अध्यात्माचा अभ्यास मोठा होता. तसें त्यांचें सर्वच आयुष्य ईश्वरचिंतनांत आणि योगाभ्यासांत गेलें. साधुपुरुषांचा त्यांच्या घराण्यावर आशीर्वादच होता असें म्हटलें तरी चालेल. त्यांचे धाकटे बंधु जन्मापासून दोन्ही पायांनीं पूर्णपणें पांगळे असूनहि योगविद्येंत त्यांनीं अलौकिक सामर्थ्य प्राप्त करून घेतलें होतें. श्री गजानन महाराज म्हणून ते पुष्कळच प्रसिद्ध होते.

गेल्याच वर्षी नाशिक येथें ते ब्रह्मीभूत झाले. गजानन महाराजांना योगाभ्यासाची पुष्कळशी स्फूर्ति 'बी' कवींकडून मिळाली. यावरून या क्षेत्रांत 'बी' कवींनी केवढें सामर्थ्य प्राप्त करून ठेवले असावें याची थोडीशी कल्पना येते. यामुळेंच अध्यात्मविद्येतलीं पुष्कळशीं रूपकें आणि भाषासंकेत त्यांच्या कवितेमध्यें आढळून येतात. तथापि इतकें असूनहि 'बीं'च्या विचारांत कोठेंहि जुनाटपणा किंवा प्रतिगामित्व आढळून येत नाहीं. 'बी' हे वृत्तीनें उत्क्रांतिवादी होते. समाजविघातक रूढींचा आणि संस्थांचा नायनाट होऊन जनता सामर्थ्यवान् व्हावयाला पाहिजे असें त्यांना मनापासून वाटत होतें. या दृष्टीनें पहातां विचारांचें हें आधुनिकत्व रे. टिळक यांच्याखेरीज त्यावेळच्या इतर कोणत्याहि कवींत आढळून येत नाहीं. जुन्या पिढींत जन्माला आलेला मनुष्य विचारानें आणि वृत्तीनें इतका आधुनिक कसा, याचें आम्हाला पुष्कळ वेळां नवल वाटतें. इतकीं वर्षे झालीं तरी 'बी' कवींच्या काव्याचा उजाळा व लकाकी आहे तशींच अजून कायम आहे. 'बीं'च्या काव्याचें हें वैशिष्ट्य फारच थोड्या आधुनिक मराठी कवींमध्यें आढळून येईल. खरोखर मराठी काव्यसृष्टींत 'बी' कवींचें स्थान अगदीं अढळ आणि अमर आहे.



व्यक्तिशः माझा आणि 'बी' कवींचा आयुष्यांत संबंध येणें हा मी अद्भुत योगायोग समजतों. दहा वर्षांपूर्वी 'फुलांची ओंजळ' हा त्यांचा काव्यसंग्रह–प्रसिद्ध करण्याचें जेव्हां त्यांच्या मित्रांनीं ठरविलें तेव्हां त्या संग्रहाला प्रस्तावना देण्यासाठीं त्यांना माझें नांव कां सुचलें हें मला ठाऊक नाहीं. 'बी'सारख्या महान् कविश्रेष्ठाच्या कविता–संग्रहाला प्रस्तावना लिहिण्याला आपल्याला अधिकार आहे असें मला चुकूनहि कधीं वाटलें नाहीं. मला त्यांच्या काव्याविषयीं किती आदर वाटत होता हें शब्दांनीं वर्णन करतां येणार नाहीं. माझे गुरु जे गडकरी ते 'बी' कवींना जवळ जवळ गुरुप्रमाणें मानीत. या हिशेबानें 'बी' कवि मला परात्पर गुरूच्याच ठिकाणीं होते. त्यांच्या काव्याला प्रस्तावना लिहिणें म्हणजे मंदिराच्या पवित्र पायरीला पाय लावण्याइतकेंच पातक आहे अशी माझी प्रामाणिक समजूत होती. या भावनेनें एकसारखा सहा महिनेपर्यंत मी त्या प्रकाशकांना नकार देत होतों. पण माझ्या नकाराच्या हेक्यामुळें त्यांच्या आग्रहाचें दडपण

अधिकच वाढत गेले. ते म्हणाले, "तुमची प्रस्तावना मिळेपर्यंत आम्ही हें पुस्तक प्रसिद्ध करणार नाहीं." एवढें त्यांनीं म्हटल्यानंतर मग या पवित्र जबाबदारीचा पत्कर न घेणें हा शुद्ध उन्मत्तपणा होता. प्रस्तावना लिहिण्याचें काम तर मी स्वीकारलें, पण तें माझ्या हातून पुरें कसें होणार याची मात्र मला फार चिंता पडली. 'बीं' कवींची कविता मी वाचली होती. मला ती अतिशय आवडत होती. पण तिच्यांतली सर्वच स्थळें मला कळत होतीं असें मात्र मुळींच नव्हतें. 'बी' च्या काव्याचें हें एक वैशिष्ट्य आहे. तें कळत नसलें तरी आपल्याला वेड लावतें. सृष्टीमधल्या पुष्कळशा सौंदर्याचें रहस्य समजलें नाहीं तरी जसें मनाला मोहित करतें तसें 'बी' च्या काव्याचें आहे. 'चांफा' ही त्यांची एकच कविता घ्या. या कवितेचा सर्व अर्थ लक्षांत आला नसतांहि महाराष्ट्र तिजवर बेहद्द खूष झालेला होता. पण प्रस्तावनाकाराचें कार्य हें केवळ रसग्रहणाचें कार्य नव्हे. कोणत्या काव्यामध्यें काय गोडी आहे आणि ती कशी उत्पन्न झाली याचें कलात्मक आणि रसपूर्ण विश्लेषण जर त्याला करतां आलें तरच तो खरा प्रस्तावनाकार ठरतो. या दृष्टीनें जवळ जवळ दोन महिने 'बी' कवींशी माझा पत्रव्यवहार चालू होता. दर पत्रांत मी त्यांच्या काव्याबद्दल अनेक प्रश्न आणि शंका विचाराव्यात आणि त्याला पानेंच्या पानें विस्तृत उत्तरें 'बी' कवींनी मला द्यावींत. अशा रीतीनें 'बी' कवींकडूनच मी त्यांची सारी कविता समजावून घेतली. त्यांची कविता आपल्याला समजली असें मला ज्या क्षणीं वाटलें त्या क्षणापासून मी प्रस्तावना लिहिण्याचें काम सुरू केलें. एवढी मोठी प्रदीर्घ प्रस्तावना मी आयुष्यांत दुसऱ्या कुठल्याहि पुस्तकाला लिहिलेली नाहीं. ही माझी प्रस्तावना फारच चांगली वठली आहे असें लोक म्हणतात. हें जर खरें असेल तर त्यांचे श्रेय 'बी' कवींना आणि त्यांच्या महान् काव्यालाच द्यायला पाहिजे. स्फूर्तीचा विषय अलौकिक असला म्हणजे सामान्य माणसाच्या हातूनहि कधीं कधीं असामान्य गोष्टी घडतात!



यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे एकोणचाळीस सालीं मी जेव्हां नागपूर येथें गेलों तेव्हां 'बी' कवींची आणि माझी आयुष्यांत पहिल्यानें भेट झाली. माझे मित्र कविवर्य 'अनिल' यांना घेऊन मी त्यांच्या दर्शनास गेलों. त्यावेळीं ते

पुष्कळच वृद्ध दिसत होते. पण थकलेले नव्हते. जवळ जवळ तास दोन तास मी त्यांच्या संगतींत होतों. आम्हीं सर्वांनीं एका फोटोग्राफरकडे जाऊन एकत्र फोटोहि पण काढून घेतला. 'बी' कवि माझ्याशीं पुष्कळच बोलले. तथापि त्यांचा स्वभाव फारसा बोलका असावा असें मात्र मला वाटलें नाहीं. केवळ मुद्यापुरतेंच ते बोलत. मात्र ते जें बोलत तें अतिशय चिंतनीय असे. त्यानंतर 'बी' कवींचा आणि माझा त्यापुढें प्रत्यक्ष संबंध असा जरी आला नाहीं, तरी 'बी' कवींच्या काव्यसंग्रहाला मी लिहिलेल्या प्रस्तावनेमुळेंच त्यांचे धाकटे बंधु श्री. गजानन महाराज यांचा आणि माझा विलक्षण ऋणानुबंध जडला. गजानन महाराज हे फारच थोर अधिकाराचे योगी पुरुष होते. पण केवळ त्यांच्या थोरल्या भावाच्या काव्याला मी प्रस्तावना लिहिली म्हणून ते खूष होऊन ते थोरल्या भावाप्रमाणेंच मला 'दादा' म्हणून हांक मारूं लागले. एकदां तर 'या दादासाहेब' असें म्हणून त्यांनीं जेव्हां माझ्या पायावर डोकें ठेवण्याचा प्रयत्न केला तेव्हां लाजेनें मला मेल्याहून मेल्यासारखें झालें. 'बी' कवि आणि गजानन महाराज या दोघां भावांचें पाठोपाठ अवसान व्हावे यामुळें व्यक्तिशः मला किती दुःख होतें आहे हें शद्बांनीं सांगणें कठिण आहे. 'बी' कवींच्या एकापेक्षां एक सरस कविता मासिक 'मनोरंजना' त जेव्हां प्रसिद्ध होत होत्या, तेव्हां त्याजवर ज्या हर्षानें आणि उन्मादानें आम्ही तरुण वाचक तुटून पडत होतों, तें स्मरण अद्यापि माझ्या हृदयांत ताजें आहे. त्या दिव्य आनंदाची पुन्हां आठवण करून महाराष्ट्राच्या ह्या प्रतिभाशाली, कलावंत आणि तत्त्वज्ञानी कवीला आम्ही शेवटचें वंदन करतों.

## तिकडून स्वातंत्र्य आणायचं झालं ! : : ७

परवां मी पुण्याला गेलों होतों. तेथें मला एक मौजेची गोष्ट कळाली. पंधरा ऑगस्टच्या स्वातंत्र्यदिनाचा उत्सव मोठ्या थाटामाटानें पार पाडल्यानंतर त्या दिवशीं रात्रीं कॉंग्रेस हाऊसमधले एक पदाधिकारी कृतकृत्य होऊन घरीं गेल्यावर आपल्या बायकोच्या पाठीवर थाप मारून मोठ्यानें हंसून म्हणाले, " काय ग, शेवटीं आणलें कीं नाहीं आम्ही स्वातंत्र्य ! शंभर वर्षांत जें कुणाला मिळालें नाहीं तें आम्हीं मिळविलं कीं नाहीं ! आणि हें सारें रक्ताचा थेंब सांडल्यावांचून बरें का ! कसा त्या माऊंटबॅटनला आम्ही चपराशी नेमला ! " भोळी बिचारी बायको. तिला वाटलें कीं हें जें सारें झालें तें केवळ आपल्या नवऱ्यामुळेंच ! आणि पंधरा ऑगस्ट रोजीं गांवभर जो प्रचंड उत्सव झाला तो केवळ आपल्या नवऱ्याच्याच पराक्रमाचा. तिला आपल्या नवऱ्याला त्या रात्रीं कुठें ठेवूं अन् कुठें नको ठेवूं असें होऊन गेलें. माऊंटबॅटनला चपराशी नेमलें हें नवऱ्याच्या तोंडचे शब्द ऐकून तर तिला वाटलें कीं त्याला उद्यापासून आपल्याच घरीं कामाला ठेवलेंय. त्या आनंदाच्या भरांत ती पाय तणावून त्या रात्रीं खुशाल झोपीं गेली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती लौकर कांहीं उठलीच नाहीं. नवऱ्याला चहाची तल्लफ आली. त्यानें तिला हलवून जागी केली. आणि तो तिच्यावर नेहमीप्रमाणें ओरडून म्हणाला, " ए, अग, चहा करतेस कीं नाहीं ? " तेव्हां बायको म्हणाली, " एवढी जिवापाड मेहेनत करून रक्ताचा थेंब न सांडतां इकडून काल स्वातंत्र्य मिळवायचं झालं अन् पुनः सकाळीं उठून चहा म्हणें मीच करायचा ! माझं अडलंय खेटर. तो तुमचा मांटूब्याटूं कोण चपराशी नेमलाय तुम्ही असं म्हणालांत ना काल ? त्यालाच सांगा इथें येऊन चहा करायला. " देशाला स्वातंत्र्य मिळाल्याचा लगेच दुसऱ्या दिवशीं आपल्या घरामध्यें असा

परिणाम होईल अशी या कॉंग्रेसवाल्या नवऱ्याला मुळींच कल्पना नव्हती. तो मुकाट्यानें आपला उठला आणि वेडेवांकडें तोंड करून स्टोव्ह पेटवूं लागला. दिवसभर ती बायको आपली अंथरुणावर पडून राहिली. ती पाणी भरीना, दळण दळीना, रेशनचें धान्य आणण्यासाठीं पिशवी घेऊन बाहेर जाईना, घरांत स्वयंपाक करीना, किंवा मुलांनाहि संभाळी ना. नवऱ्यानें तिला कांहीं करावयाला सांगितलें कीं, " तो तुमचा मांटूब्यांटू केव्हां येणार ? त्याला हें काम करायला सांगा ! मी नाहीं माझ्या जागेवरून हलणार ! " असें ती नाक उडवीत मोठ्या तोऱ्यानें त्याला सांगे. दुपारीं शेजारणी नेहमीप्रमाणें तिच्याशीं गप्पा मारायला आल्या, तर तीं फुरंगटून बसली. त्यांच्याशीं एक अक्षरही बोलेना. शेजारणींना तें अतिशय चमत्कारिक वाटलें. त्या शेवटीं कंटाळून म्हणाल्या, " असें हो काय करतां गंगाबाई ! आज तुम्हांला असें मुलखावेगळें झालंय तरी काय ? "

तेव्हां शेवटीं गंगाबाई आपल्या नाकांत हजार रुपयांची नथ आहे अशा भावनेनें ते वर उडवीत चेहरा ओवाळून एकच वाक्य म्हणाल्या, " इकडून काल एवढें मोठें स्वातंत्र्य आणायचं झालं, अन् तुम्हांला माझ्याशीं इथें येऊन बरोबरीच्या नात्यानें बोलायला लाजा नाहीं वाटत ? चला मेल्यानों इथून ! "

स्वातंत्र्याच्या येण्याचा आणि गंगाबाईच्या यजमानांचा काय संबंध आहे हें कांहीं त्या बायांना कळेना. त्यांच्यामध्यें उमाबाई नांवाची एक बाई होती. तिचाहि नवरा कॉंग्रेस हाऊसमध्यें कारकून का फारकून होता. गंगाबाईचा नवरा एकटा स्वातंत्र्य घेऊन आला हे शब्द तिच्या अगदीं जिव्हारीं झोंबले. ती एकदम उसळून म्हणाली, " तरं तर ! म्हणे तुमच्या नवऱ्यानें काल स्वातंत्र्य आणलं. बोलायला कांहीं वाटतंय का ? गेले आठ दिवस आमच्या इथें अगदीं डोळ्याला डोळा नाहीं. त्यांच्यामुळें मलाहि पण झोपा नाहींत. सारें कॉंग्रेस हाऊस आमच्या इकडनं रंगवून घेतलें. आहे ठाऊक ? आतां कसं दिसतंय तें झक ! पूर्वी तुमच्या ह्यांनीं त्याची नुसती मशीद करून टाकली होती, मशीद ! तुमचे यजमान त्या· वेळीं खुर्चीवर बसले होते पाय ताणून हुकूम सोडीत. त्यांना काय बोलायला होतंय ! स्वातंत्र्याचीं सारीं कामें करावीं लागलीं आमच्या ह्यांना ! परवा दोन दिवस साऱ्या कॉंग्रेस हाऊसवर झेंडे लावायचे काम कोणी केलें ? आमच्या ह्यांनीं !

तुमच्या यजमानांनीं एक तरी झेंडा बांधला आहे का! आणि इतकेंहि करून म्हणे तुमच्याच यजमानांनीं स्वातंत्र्य आणलें! उचलली जीभ अन् लावली आपली टाळ्याला!"

आपल्या नवऱ्याच्या हाताखालीं काम करणाऱ्या एका यःकश्चित् कारकुनाच्या बायकोनें आपल्या यजमानाचें स्वातंत्र्य आणल्याचें श्रेय हिरावून घ्यावें हें बघून गंगाबाई भयंकरच संतापल्या.

त्या दांत ओठ खात म्हणाल्या, "हो, हो, स्वातंत्र्य आमच्या इकडनंच आणायचं झालं! तुमच्या नवऱ्यानें कॉंग्रेस हाऊसवर झेंडे बांधले असतील. पण ते झेंडे बांधायला त्यांना हुकूम कोणी दिला? आमच्या ह्यांनींच ना? इतकीं वर्षे स्वातंत्र्य कोणाला आणतां आलं नाहीं, तें आमच्या इकडून आणायचं झालं! अन् ते देखील रक्ताचा एक थेंब सांडल्यावांचून!"

हें ऐकून उमाबाई अधिकच उखडल्या. त्या डोळे गरागरा फिरवीत म्हणाल्या, "बघा, बघा! रक्ताचा थेंब सांडल्यावांचून म्हणे ह्यांच्या यजमानांनीं स्वातंत्र्य मिळविलें! ह्यांच्या यजमानाचें रक्त नसेल सांडलें! पण परवां रात्रीं कॉंग्रेस-हाऊसच्या कौलारावर झेंडा लावायला आमचे 'हे' चढले होते, तर तेथून पाय घसरून ते खालीं पडले आणि त्यांचा घोळणा फुटून चांगलें तांब्याभर रक्त गेलें! इतकें ह्यांनीं आपलें रक्त सांडलें म्हणून तें मेलें स्वातंत्र्य काल एकदांचें आलें तरी." उमाबाईचें हें वाक्य पुरें होतें आहे नाहीं, तोंच गंगाबाईनीं लाल डोळे करून एकाद्या मांजरीप्रमाणें त्यांच्या गळयावर झडप घातली. उमाबाईहि कांहीं कमी नव्हत्या. त्यांनीं गंगाबाईचे दोन्ही हाडकुळे हात आपल्या लठ्ठ हातांत घट्ट पकडून ठेवले. तेव्हां मात्र गंगाबाईचा कांहीं इलाज चालेना. त्यांनीं मोठमोठ्यांनीं रडायला आणि ओरडायला सुरवात केली कीं, "इकडून काल एवढं मोठं स्वातंत्र्य आणायचं झालं अन् ही मेली आमच्या कारकुंड्याची बायको म्हणते कीं हिच्याच नवऱ्यानें स्वातंत्र्य आणलें! हिच्या मेलीच्या तोंडांत किडे पडतील बरें किडे!"

त्याबरोबर तिच्यापेक्षां चढा स्वर लावून उमाबाईनीं हंबरडा फोडला कीं, "आमच्या ह्यांनीं चांगलें पातेलेंभर रक्त सांडलें तेव्हां काल स्वातंत्र्य आलें बरें! अन् ही बया म्हणते कीं हिच्याच नवऱ्यानें स्वातंत्र्य आणलें! खोटें बोलणाऱ्याच्या तोंडाला किडे पडून त्यांतून चांगलें घागरभर रक्त जाईल तेव्हां त्यांचे डोळे उघडतील!"

त्या दोघींची ती आरडाओरड आणि भांडण मिटवितां मिटवितां शेजारणींच्या नाकीं अगदीं नव आले.

त्यामधल्या राधाबाई नांवाच्या एक पोक्त बाई दोघींची समजूत घालीत म्हणाल्या, " नाहीं, मी म्हणते, कुणी कां आणलें असेना तें मेलें स्वातंत्र्य ! पण त्यासाठीं एवढें भांडायचें काय कारण आहे ? आणलें असेल तुमच्या नवऱ्यांनीं स्वातंत्र्य तर द्या तें कॉंग्रेस हाऊसमध्यें ठेवून. म्हणजे चार लोक येऊन पहातील तरी. तुम्ही कां उगाच इथें तंडताहांत ? " तेव्हां दुसऱ्या एक यशोदाबाई म्हणून होत्या त्या म्हणाल्या, " अहो, कुठचें स्वातंत्र्य बि काय घेऊन बसलां आहांत ? अगदीं सकाळीं मी कॉंग्रेस हाऊसमधून जाऊन आलें. तिथें मला तर कांहीं स्वातंत्र्य दिसलें नाहीं. चार खादीवाले लोठे तंगड्या ताणून घोरत पडले होते. तेवढे मात्र मी पाहिलें ! "

शेवटीं कसाबसा तो तंटा मिटवून शेजारणी निघून गेल्या. आणि कॉंग्रेस-हाऊसमधल्या कारकुनाच्या बायकोनें चारचौघांसमोर आपला अपमान केला या विचारानें दुःखित झालेल्या गंगाबाई तोंडावर चौघडी ओढून अंथरुणावर धुसफुसत पडल्या.

संध्याकाळीं कॉंग्रेसहाऊसमधून नवरा परत येतो आहे, तों घरांत काय ? चोहोंकडे अंधार आणि शुकशुकाट ! पोरें रडताहेत अन् बायको अंगावर पांघरूण घेऊन तश्शी खुशाल पडली आहे ! तें बघून मात्र नवऱ्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. बायकोच्या अंगावरचें पांघरूण खस्कन् ओढून तो ओरडला, " ए, आतां उठतेस कीं नाहीं ? कां घालूं पाठींत लाथ ? सकाळपासून पुष्कळ तुझं पाहिलें आणि पुष्कळ तुझं सहन केलें ! आतां बऱ्या बोलानें उठून स्वयं-पाकाला लागतेस कीं फोडूं तुझें नरडें ? "

त्याबरोबर गंगाबाई ताडकन् उठून म्हणाल्या, " अहिंसेच्या गोष्टी जगाला सांगतां अन् घरांत बायकोचें नरडें फोडतां होय ? "

" अहिंसा गेली खड्ड्यांत ! " नवरा किंचाळून म्हणाला, " अन्, तूं आतां स्वयंपाकाला लागली नाहींस तर तूंही जाशील आणखी तिच्याबरोबर त्या खड्ड्यांत ! "

तें ऐकून गंगाबाईनीं गळाच काढला !

" मग कशाला मला सकाळीं खोटंच सांगायचं झालं कीं इकडून काल स्वातंत्र्य घेऊन यायचं झालं म्हणून ? हें तुमचं तें सत्य होय ?" गंगाबाई रडत रडत म्हणाल्या, " मीच चहा करायचा, मीच पोरांना संभाळायचं, अन् मीच पुन्हां दोन्ही वेळ स्वयंपाक करून भांडीं घासायचीं अन् धुणीं धुवायचीं होय ?" " होय, होय, हें सारें तूंच करायचें ! " गंगाबाईचा नवरा ऐतिहासिक नाटकांतल्या एकाद्या पात्राप्रमाणें हातवारे करीत ओरडून म्हणाला, " देशाला स्वातंत्र्य मिळालं म्हणून तुला घरांत स्वातंत्र्य मिळणार नाहीं. लक्षांत ठेव, तुझा आयुष्यक्रम पंधरा ऑगस्टपर्यंत जसा इथें चाललेला होता, तसाच तो यापुढेंहि चालेल. घरांतील सगळीं कामें रोज तुला स्वतःलाच करावीं लागतील. मी त्यामध्यें तुला काडीचीहि मदत करणार नाहीं ! "

त्याबरोबर गंगाबाईच्या डोळ्यांतले अश्रू नाहींसे झाले. त्यांचा चेहरा एकदम बदलला. रागारागानें त्यांनीं काड्याची पेटी हातीं घेतली व त्यांतली एक काडी पेटीच्या कडेवर जोरानें आदळून त्या म्हणाल्या, " मग आग लागेना कां तुमच्या त्या स्वातंत्र्याला ! मला काय त्याच्याशीं करायचें आहे ? " असें म्हणून त्यांनीं दिवा लावला आणि त्या स्वयंपाकाला लागल्या !

## दारू आणि अहिंसा ? : : ८

कोणतेंहि व्यसन हें वाईटच. मग तें दारूचें असो, किंवा अहिंसेचें असो. गोष्ट अति झाली म्हणजे तिचें व्यसन होतें. आणि व्यसन हें नेहमींच घातुक असतें. थोड्या प्रमाणांत दारू प्याली तर ती प्रकृतीला चांगली असते. थोड्या प्रमाणांत अहिंसा पाळली तर तिनें पराक्रमाला शोभा येते. कोणी आम्हांला विचारील कीं, तुम्ही दारूची आणि अहिंसेची काय तुलना करीत आहांत ? या दोन वस्तूंमध्यें काय सारखेपणा आहे ? म्हणून आम्हीं सांगतों कीं दारूंत आणि अहिंसेंत विलक्षण साम्य आहे. दोन्ही गोष्टींचा मोह अनावर आहे. दोन्ही गोष्टींची निशाहि अतिशय मादक आहे. या दोन व्यसनांच्या कचाट्यांत एकदां माणूस सांपडला म्हणजे त्याच्या कर्तृत्वाची आणि पौरुषाची अगदीं धूळधाण उडते. दारू थोडी घेऊन माणसाचें समाधान होत नाहीं. ती दर वेळेला पूर्वीपेक्षां जास्त घ्यावीशी वाटते. आणि दारू जास्त जास्त घेत गेलें म्हणजे दारू पिण्याची तहान अधिकच वाढत जाते. म्हणूनच एक म्हण पडलेली आहे कीं आधीं माणूस दारूला पितो, मग दारू दारूला पिते आणि शेवटीं दारू माणसाला गट्ट करते. हुबेहूब तसेंच अहिंसेचें आहे. थोडीशी अहिंसा पाळून माणसाचें समाधान होत नाहीं. अहिंसेचें विष एकदां शरिरांत शिरलें कीं, तें हळू हळू साऱ्या शरिरामध्यें पसरूं लागते आणि पौरुषाला हलके हलके त्याची बाधा होऊं लागेत. दारूचा परिणाम जसा आधीं मेंदूवर होतो आणि कांहीं वेळानें हात, पाय, आणि जीभ लुळीं पडूं लागतात, त्याप्रमाणें अहिंसेचा परिणामहि प्रथम मनावर आणि मेंदूवर होतो. अहिंसेनें आपलें 'आत्मिक बळ' वाढत चाललेलें आहे असा कैफ माणसाला चढतो. तो जास्त मान वांकवून नमस्कार करूं लागतो. कारण नसतांना दांत विचकून कृत्रिमपणें तो हसूं लागतो. उजव्या

हातापेक्षां डाव्या हातांत जास्त बळ आहे, असा त्याला भ्रम वाटूं लागतो. दारूबाजाप्रमाणेंच त्याचें चालणें, बोलणें आणि हातवारे अधिकाधिक बेंगरूळ होऊं लागतात. दारूबाजाप्रमाणें सर्व जग आपल्या भावासारखें आहे असें तो मानूं लागतो. आणि दारूबाजाप्रमाणेंच कांहीं कारण नसतांना तो प्रत्येकाची माफी मागत सुटतो. मद्यपी माणसांच्या पोटांत ज्याप्रमाणें कांहींही रहात नाहीं त्याप्रमाणें अहिंसावाल्याजवळ देखील कोणतीही गोष्ट गुप्त राहूं शकत नाहीं. उलट आपण आपला सारा व्यवहार राजरोसपणें करीत आहोंत याचा त्याला अभिमानच वाटूं लागतो. दारू प्याल्यानंतर आपण ज्ञानी झालों आहोंत असें माणसाला वाटतें व तो साऱ्या जगाला उपदेश करूं लागतो. अहिंसा डोक्यांत गेली म्हणजे जगांतली सारीं शास्त्रें आपणाला येतात असें माणसाला वाटूं लागतें. अहिंसा 'पिऊन' माणूस राजकारण करूं लागला म्हणजे तर फारच गंमत होते. तो दारूबाजा-प्रमाणें एकसारखें बडबडूं लागतो आणि मुलाखती देत सुटतो. तो आपल्या मुत्सद्देगिरीचे सारे डावपेंच आपल्या शत्रूंना तावातावानें उघडपणें सांगूं लागतो. त्यामुळें प्रतिपक्षाचा खूपच फायदा होतो. दारूचा 'एकच प्याला' घेणारा माणूस ज्याप्रमाणें शेवटीं अट्टल दारूबाज बनतो, त्याप्रमाणें 'अहिंसा' हा शब्द एकदांच तोंडानें मिटक्या मारीत उच्चारला म्हणजे तो माणूस हळूंहळूं अहिंसावादी बनतो, आणि थोड्याच वर्षांनी तो अट्टल अहिंसाबाज होतो. दारूबाजीच्या व्यसनामुळें ज्याप्रमाणें शरीराचा नाश होतो, समाजाची धूळधाण उडते, आणि राष्ट्राची राखरांगोळी बनते, त्याचप्रमाणें अहिंसाबाजीच्या घातकी व्यसनामुळें कोट्यवधि जनता निष्क्रिय आणि अगतिक बनते, सहस्त्रावधि प्राणांची हत्त्या होते, शेंकडों कुटुंबांच्या धर्मावर आणि अब्रूवर अत्याचार होऊन त्यांचे संसार उध्वस्त होतात, आणि ज्याची पाळेंमुळें वडाच्या झाडाप्रमाणें भूतकाळाच्या पोटांत शतकानुशतकें पसरलेलीं आहेत अशा प्रचंड आणि पुरातन राष्ट्राचे तुकडे तुकडे उडतात.

या देशांत इंग्रज आल्यानंतर ज्याप्रमाणें दारूचें व्यसन जास्त बोकाळलें, त्याप्रमाणें इंग्रज या देशांतून जाण्यापूर्वी अहिंसाबाजीचें हें व्यसन गेलीं पंचवीस-तीस वर्षें राष्ट्राला जडून राहिलेलें आहे. एकदां दोन दारूबाज दारू पीत बसलेले होते. त्यापैकीं एक म्हणाला, "मला आणखी एक प्याला दारू पिऊं दे

दे, म्हणजे मी इंग्लंडच्या बादशहाचा राजवाडा तुला गहाण लिहून देतों" तेव्हां दुसरा म्हणाला, " मला आणखी दोनच प्याले दारू पिऊं दे, मी सारा इंग्लंड देशच तुला खरेदी देऊन टाकतों." 'अहिंसेच्या प्रभावानें घाबरून इंग्रज लोक हा देश सोडून चाललेले आहेत' या अहिंसाबाजांच्या वल्गना या गोष्टींतल्या दारूबाजांच्या बरळण्याप्रमाणेंच हास्यास्पद आहेत. दारूच्या जशा तीन अवस्था असतात, तशा अहिंसेच्याही पण तीन अवस्था असतात. देशांतील बहुतेक सारे वृत्तपत्रकार हे आज अहिंसेच्या पहिल्या अवस्थेंत आहेत, काँग्रेसच्या मागून जाणारी देशांतील कोटयावधि जनता ही अहिंसेच्या दुसऱ्या अवस्थेमध्यें आहे आणि काँग्रेसचे उजवे आणि डावे पुढारी हे अहिंसेच्या तिसऱ्या अवस्थेमध्यें गेलेले आहेत. गांधीजींची तर तिसरी अवस्था कधींच संपून गेली आहे. ते सध्यां भयंकर अवस्थेंत आहेत. पहिल्या अवस्थेंतले अहिंसाबाज लौकर ताळयावर येऊं शकतील. आणि ते ताळयावर आले म्हणजे अहिंसेच्या दुसऱ्या अवस्थेंत गेलेल्या जनतेला ते ताळयावर आणूं शकतील. तिसऱ्या अवस्थेंत नुकत्याच शिरलेल्या काँग्रेसच्या डाव्या पुढाऱ्यांना दुरुस्त होण्याची थोडीतरी कांहीं आशा आहे. पण सुधाकराप्रमाणें अहिंसेच्या तिसऱ्या अवस्थेंत जाऊन पोहोंचलेलें उजवे काँग्रेस पुढारी शुद्धीवर येण्याची मात्र आतां मुळींच आशा उरलेली नाहीं. म्हणून त्यांचा नाद आपण अजिबात सोडून दिला पाहिजे. आणि संयमाच्या सर्व मर्यादा ओलांडून अतिरेकाच्या अत्यंत निकराच्या शेवटच्या टप्याला गांधीजी जाऊन बसलेले आहेत. 'गुंडांनी जर तुमच्या अब्रूवर हल्ला केला तर तुम्ही विष खाऊन जीव द्या' असें पूर्व बंगालच्या स्त्रियांना बजावणारे गांधीजी हे अहिंसाबाजीच्या शेवटच्या अवस्थेंत गेलेले नव्हेत काय ? 'अहमदाबादचा जातीय दंगा मी कसा थांबवू?' असें विचारणाऱ्या मोरारजी भाईंना 'तुम्ही दंग्याच्या भागांत एकटे जाऊन मरा !' असे सांगणारे गांधीजी हे अहिंसाबाजीच्या अंतिम टोकाला जाऊन पोहोंचलेले नव्हते काय ? 'रघुपति राघव राम रहीम। पतीत पावन कृष्ण करीम' ही प्राणावर उदार झालेल्या अहिंसाबाजाची शेवटची केविलवाणी धडपड नव्हे तर काय आहे ? आपल्या भविष्यकाळाची परवा न करतां सुधाकर ज्याप्रमाणें प्याल्यामागून प्याले झोकून फस्त करूं लागतो आणि 'सिंधूसकट संसाराला, मुलासकट माणुसकीला आणि जगासकट जगदीश्वराला

निर्वाणींतल्या निराशेचा अखेरचा रामराम ’ ठोकूं लागतो त्याप्रमाणें भविष्यकाळीं हिंदुस्थानचें काय होईल याची परवा न करतां ‘ हिंदुस्थाननें आपल्या संरक्षणासाठीं लष्कर ठेवतां कामा नये आणि ठेवलें तर त्यानें मुसलमानांविरुद्ध हत्यार न उपसण्याची शपथ घेतली पाहिजे ’ असे आत्मघातकी अहिंसाबाजीचे प्याल्यावर प्याले झोकून ‘ कर्तृत्वासकट काँग्रेसला, हिंदुसकट हिंदुस्थानला, आणि अब्रूसकट अखंडत्वाला ’ मूठमाती देण्याची भाषा गांधीजी आतां बोलूं लागलेले आहेत. दारुबाज सुधाकरानें ज्याप्रमाणें रामलालचें ऐकलें नाहीं, त्याप्रमाणें आतां पृथ्वीवर प्रत्यक्ष राम आणि रहीम जरी उतरले तरी इरेला चढलेले आमचे गांधीजी आपला अहिंसेचा हट्ट सोडणार नाहींत. देशाची फाळणी झाली तरी हरकत नाहीं, लक्षावधि लोक प्राणाला मुकले तरी फिकीर नाहीं आणि उरलेला सारा हिंदुस्थान पाकिस्तानच्या घशांत गेली तरी पर्वा नाहीं. पण माझी अहिंसा खरी ठरली पाहिजे हा एकच ध्यास गांधीजींनी आतां घेतलेला आहे. ‘ मी स्वतः चुकलों आहे, तीस वर्षे काँग्रेस चुकलेली आहे, जनतेनें मोठमोठ्या चुका केल्या आहेत, ’ अशी दोषांचीं खापरें साऱ्या जगाच्या डोक्यावर गांधीजी फोडत बसतील, पण आपली अहिंसा चुकीची आहे असे शद्ब मात्र प्राण गेला तरी त्यांच्या तोंडून कधींहि निघणार नाहींत. परवां दिवशींच्या प्रार्थनेंत गांधीजी म्हणाले कीं, ‘जगांत शांतता नांदावयास हवी असेल तर त्यासाठीं अहिंसा हा एकच एक मार्ग आहे.’ इतके पाहून, बघून आणि होऊनसुद्धां शेवटीं ही भाषा ! अहिंसाबाजीचा हा आत्यंतिक अतिरेक आहे. साठ वर्षें आहिंसेचें पालन करून खुद्द गांधीजींच्या मनांत जेथें शांतता प्रस्थापित झाली नाहीं, तेथें अहिंसेनें जगांत शांतता प्रस्थापित करण्याच्या गोष्टी कशाला पाहिजेत ?

दारूबाजींत आणि अहिंसाबाजींत एवढें साम्य असूनही या दोन्ही व्यसनांत एक मोठा फरक आहे. दारू पिणारा मनुष्य हा खोटें कधींही बोलत नाहीं. जगांत दारूबाजाएवढा सत्याचा पुरस्कर्ता कोणीहि नसेल. पण अहिंसाबाज माणूस हा सत्य कधींहि बोलत नाहीं. कारण डोक्यांत आणि डोळ्यांत अहिंसेचा कैफ चढल्यानंतर त्याला सत्य दिसूंच शकत नाहीं. त्यामुळें अहिंसाबाज माणूस नेहमीं असत्य बोलतो. पण आपण जें बोलतों तें सत्य असतें असें मात्र तो दिमाखानें जगाला सांगत सुटतो. मुस्लिम लीगच्या दाराशीं मी फिरून कधींहि जणार नाहीं असें अहिंसाबाज माणूस छातीवर हात मारून बोलतो.

आणि दुसऱ्याच क्षणीं तो जिनांच्या घराचा जिना चढूं लागतो. सोळा मेची योजना ही अखंड हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची योजना आहे असें अहिंसाबाज माणूस आधीं आग्रहानें बोलतो आणि मागाहून तीच योजना पाकिस्तानची योजना होती असें तो आपणास बजावून सांगतो. देशाचे तुकडे होण्या आधीं माझ्या देहाचे तुकडे होतील अशी वीरगर्जना करणारा अहिंसाबाज माणूस शेवटीं देशाच्या फाळणीला मान्यता देवून मोकळा होतो. उभ्या हयातींत तलवार कशी असते हें डोळ्यानें देखील ज्यानें पाहिलें नाहीं असा अहिंसाबाज 'तलवारीला तलवार भिडेल' अशा वीरश्रीच्या आरोळ्या बेदिक्कत ठोकूं लागतो. मुसलमानांच्या अत्याचाराला भिऊन फाळणीला संमति देणारा भेकड अहिंसाबाज 'काँग्रेसचा महान् विजय झाला आणि जीनांचा भयंकर पराभव झाला' असें जाहीरपणें सांगावयाला मागेंपुढे पहात नाहीं. पंधरा ऑगस्टनंतर आम्ही अलौकिक पराक्रम दाखविणार आहोंत असें मिशीला पीळ भरून सांगणारा अहिंसाबाज शेवटीं गोऱ्या साहेबालाच हिंदुस्थानचा पहिला गव्हर्नर जनरल नेमण्याची शिफारस करतो. छे, छे, छे, अहिंसाबाज माणूस सत्याची जेवढी हिंसा करतो, तेवढी हिंसावादी माणसाच्या हातूनही कधीं हिंसा घडत नसेल, म्हणून अहिंसाबाजावर जो विश्वास ठेवील त्याचा सर्वनाश झाल्यावांचून रहाणार नाहीं. वेश्या आणि जुगार हे दारूबाजाचे जसे दोन दोस्त असतात, त्याप्रमाणें असत्य आणि भ्याडपणा हे अहिंसाबाजाचे दोन जानी दोस्त असतात. अहिंसेनेंच अखेर मानवतेचें कल्याण होणार असें अहिंसाबाज सांगतात हें खरें. पण त्याचा प्रत्यक्ष पुरावा अद्याप तरी ह्या पृथ्वीतलावर कांहीं पहावयाला सांपडलेला नाहीं. अहिंसाबाजीपासून जो जो समाज आणि जें जें राष्ट्र दूर राहिलें आहे त्याचें नेहमीं कल्याणच झालेलें आहे. अहिंसेचा नाद जनाब जीनांना लागला असता तर अवघ्या सात वर्षांत कसलाहि पराक्रम न करतां स्वतंत्र पाकिस्तान फुकट त्यांच्या पदरांत पडलें असतें होय ? म्हणून अहिंसाबाजीच्या तिसऱ्या अवस्थेंत शिरलेल्या काँग्रेस पुढाऱ्यांचा नाद सोडून अहिंसेच्या मोहापासून धैर्यानें आणि निश्चयानें जनता जर परावृत्त झाली तरच तिची आतां धडगत आहे. मग सांगा, देशांत दारूबंदी होण्याच्या आधी कायद्यानें अहिंसाबाजीची बंदी व्हावयाला पाहिजे असें तुम्हाला वाटत नाहीं काय ?

## कालिदासांच्या ‘ शाकुंतल ’मधील विनोद : : १

जुन्या संस्कृत नाटकामध्यें उत्तम विनोद फारसा आढळून येत नाहीं. कारण विनोद निर्माण करण्यासाठीं विदूषक हें पात्र मुद्दाम नाटकांत घालावयाचें अशी पूर्वीची पद्धत असे. ‘ विदूषक ’ या नांवावरूनच तो काय दर्जाचा विनोद सिद्ध करीत असेल याची कोणालाहि कल्पना येण्यासारखी आहे. विदूषक हा जातीनें ‘ भटजी ’ असे आणि तो आपल्या जातीप्रमाणें खादाड, भित्रा, बावळट आणि मठ्ठ डोक्याचा असे. एवढी भरपूर सामुग्री विदूषकाच्या स्वभावांत ठेवून दिल्यानंतर मग नाटककाराला विनोद निर्माण करण्यासाठीं आणखी काय हवें आहे ? माणसांतील कोणतेहि दोष किंवा व्यंगें अनंत असल्यानें विनोदाच्या विविधतेलाहि कांहीं अंत उरलेला नाहीं ! ही विविधता जी सध्यांच्या जगांतील विनोदी वाङ्मयांत भरपूर आढळून येते, ती ग्रीक किंवा संस्कृत वाङ्मयांत आढळून येत नाहीं. त्या वेळचा विनोद हा ठोकळ मानानें अगदींच ठराविक आणि ढोबळ असे. त्यांत कोमलता चपलता, आणि खेळकरपणा हे गुण मुळींच आढळून येत नाहींत. असे गुण जर कधीं कशांत आढळून आलेच तर ते संस्कृत नाटकांपेक्षां संस्कृत काव्यांत–विशेषतः सुभाषितासारख्या कवितांमध्यें अधिक प्रमाणांत आढळून येतात. किंबहुना असेंहि म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं कीं, संस्कृत कवितेमध्यें पुष्कळ वेळां उत्तम प्रकारचा कोटीबाज आणि चपल विनोद आढळून येतो.

महाकवि कालिदासाचें ‘ शाकुंतल ’ नाटक हें तर बोलून चालून अमर काव्यच आहे ! कालिदासाची कीर्ती तर केवळ त्याच्या काव्यामुळेंच आहे. आणि ‘ शाकुंतल ’ ही त्याच्या कल्पनासौंदर्याची आणि प्रतिभाविलासाची परिसीमा आहे ! तेव्हां

अशा ‘ शाकुंतलां ’ त विनोदाला कितीसा अवकाश असणार ? आणि तेंहि खरेंच आहे. ‘ शाकुंतलां ’ तील विनोद तसें पाहिलें तर फारच थोडा आहे. पण मौजेची गोष्ट अशी कीं, हा विनोद थोडासा असूनहि तेजस्वी आहे. त्यांत जुन्या संस्कृत विनोदाचा ठराविक ढोबळपणा आणि मठ्ठपणा मुळींच आढळून येत नाहीं. उत्तम कवि हा उत्तम विनोदपंडित व्हावयाला कांहींच अडचण नसते. कारण काव्य आणि विनोद यांत कोणत्याहि तऱ्हेचा विरोध नाहीं. त्यांच्या सिद्धीची पद्धत तेवढी निराळी आहे. एकाचा विषय आनंद आहे तर दुसऱ्याचा विषय दुःख आहे. तथापि, दोहोंचे हेतू एकच आहेत. काव्य आनंदाचा गुणाकार करते, तर विनोद दुःखाचा भागाकार करून त्यांतून आनंद तेवढाच ‘ बाकी ’ ठेवतें. दोन वस्तूमधील साधर्म्य बघणें ही काव्याची दृष्टी असली, तर दोन वस्तुमधील वैधर्म्य किंवा विसंगति पहाणें ही विनोदाची दृष्टी आहे. ‘ चंद्र हा आकाशाच्या जलाशयांतील उमललेल्या कमळासारखा आहे ’ असें म्हटलें म्हणजे काव्य निर्माण होतें, आणि ‘ चंद्र हा आकाशाच्या ताटामध्यें ठेवलेल्या बत्ताशासारखा पांढरा आणि वाटोळा आहे ’ असें म्हटलें म्हणजे विनोद होतो.

एकूण उत्तम कवीला उत्तम विनोदाच्या बाबतींत मुळींच अडचण पडूं नये. अर्थात् सृष्टीमधील काव्यात्मक आणि कलात्मक साधर्म्य शोधण्यांत तो इतका रंगून आणि गुंगून गेलेला असतो कीं मानवी जीवनांतील आणि स्वभावांतील विलक्षण वैधर्म्य आणि विसंगतीकडे थट्टेच्या खेळकर दृष्टीनें पहाण्याच्या तो सहसा मनःस्थितींत असूं शकत नाहीं ! ‘ काव्य हें ढगांत असतें, विनोद हा जगांत असतो ’ असें मार्क ट्वेननें म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. अलिकडे कवि जगाकडे पहावयाला लागलें असलें तरी ते ढगांतूनच जगाकडे पहातात. किंबहुना ढगामधून जगाकडे पहाणें यांतच मुळीं काव्य आहे. विनोदी लेखक दुःखी कष्टी माणसामध्यें रहात असतो. लहान मूल धडपडलें म्हणजे ‘ तो बघ उंदीर पळाला ! ’ असें म्हणून आपण त्याचें लक्ष दुसरीकडे वेधतो आणि त्याला हंसावयाला लावतो. त्याप्रमाणेंच दुःखी जगाचें लक्ष ढगाकडे लावून त्याला आपल्या यातनेचा विसर क्षणभर पाडणें हें विनोदी लेखकाचें कार्य असतें. काव्य आणि विनोद हें केवळ दृष्टीमधलें अंतर आहे. तथापि एक मात्र गोष्ट खरी कीं, उत्तम विनोदी लेखकाच्या भावनेंत काव्य असल्यावांचून त्याला विनोद निर्माण करतां यावयाचा नाहीं.

कालिदासानें मनांत आणलें असतें तर तो उत्कृष्ठ विनोद निर्माण करूं शकला असता. तशा तऱ्हेचें तेजस्वी पुरावे त्यानें 'शाकुंतल' नाटकामध्यें देऊन ठेवलेले आहेत यांत मात्र शंका नाहीं. 'शाकुंतल' नाटकांत विनोद निर्मिति करण्यासाठीं कालिदासानें विदूषक माढव्य हें पात्र घातलेले आहे. 'माढव्य' या नांवापासून विनोदाला सुरवात होतें. तथापि 'शाकुंतल' नाटकामधील उत्कृष्ठ विनोद म्हणून जो मला वाटतो तो विनोद माढव्याच्या आधारानें निर्माण झालेला नव्हे. याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं माढव्याचा विनोद कमी प्रतीचा आहे. किंबहुना इतर संस्कृत नाटककारांच्या विदूषकापेक्षां किंवा कालिदासाच्या दुसऱ्या विदूषकापेक्षां मला त्याचा माढव्यच अधिक आवडतो. तो नेहमीच्या विदूषकासारखा निव्वळ ढोबळ ठोंब्या नव्हे. त्याच्यांतहि कांहीं बुद्धिचें हलुवार चापल्य असल्याचें आढळून येते.

'शाकुंतल' नाटकामध्यें पहिल्या तीन अंकांतील प्रधानरस श्रृंगार आहे. चवथा अंक करुणरसानें ओथंबलेला आहे. पांचव्या, सहाव्या आणि सातव्या अंकांत विशेषेकरून निर्भेळ असा एक रस नाहीं. कारुण्य, शृंगार, अभ्दुत, इत्यादि रसांचे त्यामध्यें पुष्कळसें मिश्रण आहे. नाटकांतील बहुतेक सर्व शृंगारामधून विनोदाची नाजुक गुंफण केलेली आढळून येतें. शकुंतला दुष्यंताच्या दृष्टीस पडतें. तिचें सौंदर्य बघून तो एकदम तिच्यावर मोहित होतो. या प्रसंगीं आपल्या विनोदाचा तेजस्वी विलास प्रेक्षकांना दाखवून त्यांचीं अंतःकरणें झटक्यासरशी कालिदासानें जिंकून टाकलेली आहेत. हा विनोद शृंगारिक आणि थोडासा वात्रट असला तरी त्यामुळें रसिकांच्या काळजांत क्षणभर हर्षाच्या गोड गुदगुल्या उठल्याविना रहात नाहींत. शकुंतलेचे वल्कल प्रियवंदेनें गच्च आवळून बांधलेलें आहे; 'तें वल्कल अंमळ सैल कर' असें ती अनुसयेला सांगते. प्रियंवदा बोलून चालून वात्रटच! आपला दोष शकुंतलेनें काढला हें तिला कसें बरें खपणार? तिनें शकुंतलेला एकदम टोमणा लगावला कीं, 'तुझ्या वक्षस्थळाचा विकास करणाऱ्या तारुण्याला बोल लाव—मला कां दोष देतेस!' या उद्‌गारांतील विनोद शृंगारावर आधारलेला असल्याकारणानें त्याची गोडी मोठी मोहक आणि मादक झालेली आहे यांत शंका नाहीं.

त्यानंतर आम्रवृक्षांशीं निगडित झालेल्या वनज्योत्स्नेकडे शकुंतला जेव्हां टक लावून पहाते तेव्हां प्रियंवदा तिची थट्टा करते, तीहि मोठी गोड आहे. प्रियंवदा

अनुसयेला म्हणते, "अनुसये, शकुंतला वनज्योत्स्नेकडे इतकी टक लावून कां पहाते आहे हें आहे कां माहित?" अनुसया म्हणते, "नाहीं बाई लक्षात येत. सांग बघूं!" तेव्हां प्रियंवदा म्हणते, "जशी वनज्योत्स्नेची योग्य पतीशीं गांठ पडली आहे तशी आपलीहि अनुरूप पतीशीं पडेल काय, असें शकुंतलेला वाटते आहे बरें कां!" शकुंतलेच्या बारीक सारीक हालचालींतून थट्टेखोर प्रियंवदा जो मजेदार अर्थ बाहेर काढते आहे, त्यामुळें मोठा खुमासदार विनोद निर्माण झालेला आहे. शकुंतलेच्या पाठीमागें भुंगा लागतो, आणि भित्री शकुंतला त्याला भिऊन इकडे तिकडे धांवूं लागते. तिच्या मैत्रिणी भुंग्यापासून तिचें 'संरक्षण' करीत नाहींत; म्हणून शेवटीं राजा दुष्यंताला प्रकट होऊन तिची सुटका करावी लागते. या सर्व प्रसंगामध्यें काव्यापेक्षां विनोदच अधिक आहे! शृंगारिक विनोदाचा इतका काव्यमय आणि कलात्मक विलास माझ्या तरी पहाण्यांत दुसरीकडे कुठें आलेला नाहीं. राजाला बघून शकुंतला आणि तिच्या सख्या तर गोंधळून जातातच. बोलून चालून त्या तरुण मुलीच, आणि त्यांतून आश्रमांतल्या. दुष्यंतासारखा परपुरुष अद्यापि त्यांनीं कधीं पाहिलेला नाहीं! आणि तशांत तो प्रकटहि झाला जो त्यांच्यासमोर तो अचानक आणि विलक्षण तऱ्हेनें! पण मौजेचीं आणि गंमतीची गोष्ट अशी कीं, त्या मुली जितक्या गोंधळल्या नसतील तितका आमचा राजा गोंधळून गेला. कालिदासाच्या विनोदाची खरी लज्जत या ठिकाणीं चाखायला मिळते. मुलींनीं पुरुष बघून गोंधळावें हें ठीकच आहे. पण पुरुषासारख्या पुरुषानें आणि त्यांतून दुष्यंत राजासारख्या पुरुषानें मुलींना बघून गोंधळून जाणें यांतच विनोदाची खरी बहार आहे.

शकुंतलेला पाहून राजाची कशी तिरपीट उडाली ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे तिच्याशीं त्याला काय बोलावें हें सुचत नाहीं. तो बावळटासारखा तिला विचारतो, "काय, तुमचें तपबीप सारें ठीक चाललें आहे ना?" शकुंतलेसारख्या नाजूक लावण्यलतिकेला झाडांना कळशीनें पाणी घालावे लागत आहे हें बघून ज्या राजाच्या मनांत सुरवातीला असा विचार आला कीं, "हिला आश्रमांतलीं असलीं कामें सांगणाऱ्या काश्यप महर्षींना कांहींच तारतम्य नाहीं असेंच म्हटलें पाहिजे!" त्या राजाला तप करण्याइतकी शक्ति शकुंतलेमध्यें आहे असें वाटणें शक्य नाहीं! शकुंतलेसारख्या

तरुण मुलीला पाहून 'तुमचें तपबीप कसें चाललें आहे ?' असा रुक्ष प्रश्न विचारण्याइतका राजा अरसिक खास नव्हता. कॉलेजांत जाणाऱ्या एकाद्या तरुण मुलीला बघून आषक झालेल्या तरुणानें 'काय, गीताबीता नियमितपणें वाचतां कीं नाहीं ?' असें विचारणें हें जितकें हास्यपूर्ण आहे, तसाच राजाचा तपाबद्दलचा प्रश्न आहे. हा प्रश्न अधिक विनोदी वाटण्याचें कारण असें आहे कीं, शकुंतलेला बघून राजाच्या मनाची जी चलबिचल झाली ती त्याला शकुंतला आणि तिच्या सख्या यांच्यापासून लपवायची असते. जणूं काय आपण 'तसलें' नाहींत, किंबहुना त्या गांवचेंहि नाहींत असे त्यांना वाटावें. तपाविषयीं प्रश्न विचारला कीं, त्या मुलींना आपल्या हेतूचा संशयहि येणार नाहीं ! त्यांना वाटेल कीं, हा कोणीतरी धार्मिक प्रवृत्तीचा मोठा सत्शील आणि निरुपद्रवी प्राणी दिसतो आहे. आणि पुढें 'तुम्ही कोण, कुठलें?' असा जेव्हां मुली त्याला प्रश्न विचारतात, तेव्हां त्याला तें सोंग पुढें चालविणें भाग पडतें. तो उत्तर देतो, "पौरव राजानें मला धर्म-खात्यावर अधिकारी नेमले आहे, म्हणून धर्मक्रिया निर्विघ्नपणें चालल्या आहेत कीं नाहींत, हें पहाण्यासाठीं मी या तपोवनांत आलेलों आहे !"

राजाचें हें उत्तर ऐकून प्रेक्षक पोट धरधरून हंसल्यावांचून रहाणार नाहींत. राजानें आपल्या अंगावरची राजचिन्हें किंवा राजवस्त्रें दूर केली होती तरी त्याच्या मोहक आणि राजबिंड्या मुद्रेवरून आणि अंगकांतीवरून हा 'धर्मखात्यांतला' एक अधिकारी आहे असें समजण्याइतक्या कण्वबावांच्या आश्रमांतल्या पोरी बावळट नव्हत्या ! निदान शकुंतला नव्हती आणि प्रियंवदा तर नव्हतीच नव्हती! अनूसया मात्र अगदींच भोळी आणि बावळट ! ती त्यावर म्हणते, "धर्मानें वागणाऱ्या माणसाला आतां पाठीराखाच मिळाला म्हणायचा !" अनुसयेचें हें वाक्य म्हणजे राजाच्या बोलण्यानें निर्माण केलेल्या विनोदावर कडीच आहे ! अनुसयेचें हे उद्गार ऐकून राजाच्या मुद्रेवर जो कांहीं फेरफार घडून आला असेल तो कालिदासानें प्रत्यक्ष वर्णन केला नसला तरी तो कालिदासाला बिलकूल अभि-प्रेत नसेल असें कसें म्हणतां येईल ! मुंबईच्या मलबार हिलवरील एकाद्या बंगल्याच्या बागेंत कुणा श्रीमंताच्या तरुण मुली खेळत असतां एकाद्या गुलहौशी तरुणानें तेथें एकदम 'दत्त' म्हणून प्रकट व्हावें आणि मुलींनीं विचारलें कीं, 'तुम्ही कोण ?' तर 'हिंदूधर्माचें पालन ह्या भागांतील तरुण मंडळी कशी काय

करतात हें पहाण्यासाठीं शंकराचार्यांनीं मला पाठवलें आहे' असें त्यानें उत्तर द्यावें अन् त्या मुलींमधील एकाद्या बावळट मुलीनें, 'अगबाई, आतां मात्र हिंदू धर्माला खरा आधार मिळाला!' असें त्याला बघून म्हणावें म्हणजे जसा बहारीचा विनोद निर्माण होईल, तशाच तऱ्हेचा लज्जतदार विनोद वरील प्रसंगीं कालिदासानें साधलेला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

शकुंतलेचें चरित्र ऐकण्यासाठीं राजा उतावीळ होतो. कारण त्याला माहिती पाहिजे असते कीं, ही सुंदर मुलगी क्षत्रियाची आहे कीं ब्राह्मणाची आहे, आणि लग्न करण्याचा तिचा खरोखरच विचार आहे किंवा नाहीं. नाहींतर आपण हिच्याबद्दल कांहीं अपेक्षा करावयाच्या आणि शेवटीं भलतेंच कांहींतरी कुलंगडें निघून परत आपल्याला हिरमुसल्या तोंडानें आश्रमामधून परत जायची पाळी यावयाची. पण शकुंतलेला आणि तिच्या सख्यांना असले प्रश्न करावयाचे कसें? शकुंतलेच्या वैयक्तिक जीवनाबद्दल स्वतःच्या हेतूबद्दल संशय न येईल अशा बेतानें कसें कौतुहल दाखवायचें? तो राजा असला आणि अनेक राण्याशीं लग्नें लावण्याइतका तो रंगेल असला तरी त्यालाहि कांहीं सभ्यतेच्या मर्यादा होत्याच! राजाच्या मनाची ही स्थिति धूर्त प्रियंवदेनें तत्काळ ओळखली! तिनें हंसत हंसत राजाला सरळ विचारलें कीं, "काय हो, आणखीहि कांहीं विचारावयाचें दिसतें आपल्या मनांत!" प्रियंवदेनें नेमकें राजाच्या वर्मावरच बोट ठेवलें! आतां तिला कसें उत्तर याव-याचें! मोठी पंचाईतीची परिस्थिति निर्माण झाली. पण राजानें प्रसंगावधान दाखवून जें उत्तर दिलें त्यामुळें फारच उत्तम तऱ्हेचा विनोद निर्माण होतो. राजा तिला म्हणाला, "बरोबर ओळखलेत! चांगल्या माणसांचें चरित्र ऐक-ण्याची आवड असल्यानें आणखीहि कांहीं विचारावयाचें आहे खरें." राजाच्या या उत्तरावर प्रियंवदेनेंहि मोठें गंमतीदार उत्तर दिलें आहे. ती म्हणाली, "मग अगदीं अनमान करायला नको! तपस्वी लोकांना काय हवे ते खुशाल विचारावें!" राजाला संकोच न वाटतां हवी ती माहिती मिळवून देण्यासाठीं प्रियंवदेनें जी ही मोकळी वाट करून दिली ती बघून तिच्या खुबीदार चाणाक्षपणाचें हास्ययुक्त कौतुक केल्यावांचून प्रेक्षक रहात नाहींत!

पहिल्या अंकाच्या शेवटीं शकुंतला राजाला सोडून आपल्या पर्णकुटींत जेव्हां जाऊं लागते तेव्हां सख्यांना सोडून मागें रेंगाळण्यासाठीं शकुंतलेनें 'कोवळ्या

दर्भाचें टोंक पायांत शिरल्याची आणि कोऱ्हांटीच्या फांदीला वल्कल अडकल्याची' जी काव्यमय सबब शोधून काढलेली आहे त्यांतील बहारदार विनोद बघून कोणत्याहि सहृदय प्रेक्षकाच्या काळजांत गोड गुदगुल्या खदखदल्याखेरीज रहाणार नाहींत ! कांटा नव्हे बॅर कां ? कांटा पायाला रुतल्याच्या थापा आधुनिक गद्य तरुणांनी याव्यात ! कालिदासाची शकुंतला पराकाष्ठेची कोमल आणि काव्यात्मक होती. कण्वऋषींच्या आश्रमांत कांटे अगदींच नसतील अशांतला भाग नाहीं. तथापि, कांटा बोचल्याची तक्रार करण्याइतकी शकुंतला अरसिक नव्हती. तिच्या पायाला काय टोचलें आहे तर तें दर्भाचें टोंक ! कसल्या दर्भाचें तर तें कोवळ्या ! म्हणजे शकुंतलेचे पाय किती लुसलुशीत आणि मुलायम असावेत कीं, त्याच्यांत कोवळ्या दर्भाचें टोंक देखील शिरूं शकतें, अन् तेवढी 'कोमल' टोचणी सहन करण्याची सोशिकता देखील शकुंतलेंत नाहीं म्हणजे ती किती नाजुक असली पाहिजे ! आकाशांतून जाणाऱ्या नारदाच्या गळयांतील माळ तुटून अंगावर पडल्यानें मरण पावलेल्या 'रघुवंशां'तील इंदुमतीचीच ही बहिण नव्हे कां ?

तथापि, गंमत ही कीं, शकुंतलेचा कोमलपणा किंवा नाजुकपणा प्रत्यक्षपणें कालिदासाला इथे सुचवावयाचा नाहीं ! मागें राहून राजाच्या तोंडाकडे बघायला मिळावें म्हणून बतावणीं करणारी प्रेमविव्हल शकुंतला किती 'नाजुक थापा' मारते आहे हें कवीला दाखवून विनोद निर्माण करावयाचा आहे ! पण तो विनोद निर्माण करतां करतां त्यानें शकुंतलेच्या कोमलतेचें काव्यहि हळूंच गुणगुणून टाकलें. काव्य आणि विनोद याचा इतका हृदयंगम संगम साहित्यांत क्वचित्च पहावयास मिळेल.

दुसऱ्या अंकामध्यें विदूषकाच्या विनोदाला भरपूर वाव मिळालेला आहे. शिकारीचा शोक असलेल्या दुष्यंत राजाच्या संगतींत सुखास लालचावलेल्या आपल्या शरीराची आणि जीभेची किती परवड झालेली आहे याचें मोठें गंमतीदार वर्णन विदूषक प्रेक्षकांना सांगतो. तथापि, तें वर्णन अगदींच ठराविक सांच्याचें असल्यामुळें त्यांतील विनोद अगदींच सामान्य विदूषकी थाटाचा आहे. राजा जेव्हां विदूषकाला आपली शकुंतलेविषयींची भावना सांगतो, तेव्हां विदूषकाचा खरा विनोद प्रकट होतो. अनेक स्त्रियांशीं आधीं

लग्नें झालीं असतांहि राजे महाशयांनीं हा जो नवीन 'षोक' आरंभला आहे तो पाहून विदूषक राजाची अशा कांहीं इरसाल शब्दांत संभावना करतो कीं, विचारूं नका. तो म्हणतो, "खजूर खाऊन विटलेल्या माणसाची जशी चिंचेवर वासना जावी तशी उत्कृष्ट स्त्रियांचा उपभोग घेतल्यानंतरची तुझी ही इच्छा आहे!" राजा शकुंतलेच्या दैवी लावण्याचें जेव्हां यथार्थ वर्णन करतो तेव्हां "असें असेल तर जगांतील सर्व सुंदर स्त्रियां आतां मागें पडल्या बरें कां!" असें विदूषक बावळट चेहरा करून म्हणतो, तेव्हां प्रेक्षकांच्या पोटांत हास्याच्या उकळ्या फुटल्यावांचून रहात नाहींत! शकुंतलेसारखें 'न हुंगिलेलें पुष्प' आणि 'अविंधलें मौक्तिक' कोणाच्या नशिबीं बसविण्याचें ब्रह्मदेवाच्या डोक्यांत आहे कोणास ठाऊक. अशा काळजीनें जेव्हां राजा चिंतातुर होतो तेव्हां 'मग लवकर तिला सोडीव रे बाबा! नाहीं तर इंगुदीच्या तेलानें मेणचट झालेल्या एकाद्या रूक्ष तपस्वी बुवाच्या ती हातांत लागायची' असें म्हणून विदूषक जी भीति व्यक्त करतो, ती मोठी हास्यकारक आहे. राजा आपल्या आणि शकुंतलेच्या भेटीचें आणि प्रथम दर्शनीं दोघांमध्यें घडलेल्या संवादाचें नि उत्पन्न झालेल्या भावनेचें जेव्हां रसदार वर्णन करतो तेव्हां विदूषक मिटक्या मारीत राजाला शाबासकी देतो कीं, "तूं तर या तपोवनाचें उपवन करून टाकले आहेस रे बुवा!" तपोवनाचें उपवन करून टाकलें ही कल्पना खरोखरच अतिशय हृदयंगम आणि विनोदी आहे. निदान सामान्य विदूषकांच्या तोंडून ती कांहीं ऐकावयाला मिळावयाची नाहीं.

शकुंतलेच्या भेटीसाठीं राजा अतिशय उतावीळ झालेला असतो; पण त्याला स्वतःचें शिबीर सोडून आश्रमांत जाण्यासाठीं काय निमित्त शोधून काढावें हें सुचत नाहीं. अशा वेळीं आश्रमामध्यें यज्ञकार्याला सुरवात होणें आणि त्या कार्यांत राक्षसांनीं कांहीं विघ्न निर्माण करूं नये म्हणून राजानें आश्रमांत येऊन रहावें आणि आश्रमाचें रक्षण करावें अशी विनंति करण्यास कांहीं ऋषी राजाकडे येतात. राजा त्यांची विनंति एकदम मान्य करतो. ही घटनाहि विनोदी आहे असें म्हणतां येईल. विदूषक राजाच्या कानांत हळूंच पुटपुटतो देखील कीं, "ही विनंति ह्यावेळीं तुझ्या चांगलीच पथ्यावर पडली आहे!" आश्रमांतील धर्मक्रिया निर्विघ्नपणें चालल्या आहेत कीं नाहीं हें पहाण्यासाठीं राजानें आपली नेमणूक केली आहे अशी थाप शकुंतलेला आणि तिच्या सख्यांना आरंभी जी दुष्यंतानें दिलेली

आहे ती शेवटीं खरीच ठरून मोठी मौज निर्माण होते. पण याच सुमारांस राजधानीकडे तांतडीनें परत निघून येण्याविषयीं राजमातेचा राजाला निरोप येतो. येथें दुसरी विनोदी घटना निर्माण होते! आतां आश्रमांत जायचें कीं राजधानीकडे जायचें? एकीकडे शकुंतलेचा चटका तर दुसरीकडे आईच्या रागाचा फटका! राजाला काय करावें तेंच कळेना! विदूषक त्याला म्हणाला, 'बैस, आतां त्रिशंकूसारखा मध्येंच लोंबत!' पण राजा थोडाच त्रिशंकूसारखा लोंबत बसणार? त्यानें विदूषकालाच बनविलें आणि स्वतःची सोयीस्कर सोडवणूक करून घेतली! आजपर्यंत विनोदी पात्रें इतर गंभीर पात्रांना 'बनवून' त्यांची थट्टा करीत असत. पण विनोदी पात्राला बनवून त्याला हास्यविषय केला असल्याचें हें एक अपूर्व उदाहरण आहे.

राजा आपलें सारें सैन्य विदूषकाच्या ताब्यांत देऊन त्याला मोठ्या थाटामाटांनें राजधानीला पाठवून देतो. विदूषकाला वाटतें कीं आपण जणूं काय युवराजच झालों! तथापि, राजधानीला पोहोंचल्यानंतर जनानखान्यांत जाऊन हा मठ्ठ माणूस कांहींतरी गोंधळ घालील म्हणून राजानें विदूषकाला आणखी 'बन-विण्याचा' प्रयत्न केला. तो म्हणाला, "मघाशी मी तुला शकुंतलेबद्दल जें सांगितलें ती सर्व थट्टा बरें काय! नाहीं तर तूं तें खरेंच समजशील आणि सारा घोटाळा होईल! आम्ही कुठें, ती कुठें, कसचें प्रेम अन् कसचें काय घेऊन बसला आहेस! थट्टेंत माणूस जे बोलतो तें अगदीं अक्षरशः खरें मानावयाचें नसतें बरें कां!" भोळा बिचारा विदूषक! थट्टा अक्षरशः खरी मानावयाची नाहीं हे राजाचें म्हणणें त्यानें ऐकलें आणि राजाच्या गंभीर बोलण्यावर शब्दशः विश्वास ठेवून शेवटीं राजाची थट्टा त्याच्यावर अशी कांहीं त्यानें उलटवून दिली कीं, राजाला त्याबद्दल चांगलीच जन्माची अद्दल घडली! थट्टेची मस्करी कशी होते आणि त्या मस्करीची शेवटीं कुस्करी कशी होते याचें हें चांगलें उदाहरण आहे. पांचव्या अंकांत जेव्हां माहेराहून शकुंतला आपल्या पतिगृहीं येते आणि 'मी तुझी लग्नाची बायको आहे' असें राजाला सांगते तेव्हां दुर्वासाच्या शापानें स्मृतिभ्रंश झाल्यामुळें राजा शकुंतलेला मुळींच ओळखूं शकत नाहीं! राजाचा त्यांत कांहींच दोष नसतो. विदूषक तेथें शेजारीं उभा असतो. कण्वाश्रमांत राजा मृगया करावयाला गेला असतां त्याचें

शकुंतलेवर प्रेम बसलें होतें ही गोष्ट राजानें त्याला सांगितलेली होती. तेव्हां शकुंतला सांगते तेवढ्या सर्व भानगडी करण्याइतकें आपले राजेसाहेब रंगेल आणि 'लफडेबाज' आहेत हें न ओळखण्याइतका विदूषक कांहीं गाढव नव्हता. तथापि, तो मुकाट्यानें तोंड मिटून सर्व गोष्टी पहात होता. कारण राजानें त्याला सांगून ठेवले होते कीं, आपण शकुंतलेबद्दल जे कांहीं बोललों तीं नुसती थट्टा होती. आणि थट्टेंतलें बोलणें खरें मानावयाचें नसतें! राजाची आज्ञा विदूषकानें शद्बशः पाळली म्हणूनच त्याला आणि शकुंतलेला अनेक वर्षेंपर्यंत हाल अपेष्टांच्या दिव्यांतून जावें लागलें. किंबहुना, नाटकांतील शेवटच्या तीन अंकामधील दुःखकारक घटनेला केवळ विदूषकच जबाबदार आहे, असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं. मूर्ख माणसाची थट्टा केली म्हणजे परिणाम किती भयंकर होतो हें शाकुंतल नाटकांत कालिदासानें स्पष्टपणें दाखविलेलें आहे. विदूषकानें पांचव्या अंकांत तोंड उघडलें असतें तर दुष्यंत शकुंतलेचें मीलन होऊन मोठ्या आनंदीआनंदांत नाटक संपलें असतें. पण विदूषकाच्या अक्कलेमुळें जो हा सारा गोंधळ माजला तो कितीहि यातनाकारक असला तरी सर्व गोष्टी समाधानकारक तऱ्हेनें मिटल्यानंतर मागाहून विदूषकाच्या मूर्खपणाची आठवण होऊन प्रेक्षकांना हंसू कोसळल्यावांचून कांहीं रहात नाहीं. या दृष्टीनें ह्या साऱ्या कथाभागांत कालिदासाची विनोद-प्रतिभाच विहार करीत आहे असें सूक्ष्म दृष्टीनें पहाणारास आढळून येईल.

तिसऱ्या अंकांत शकुंतलेला मदनबाधा झालेली असते अशा गोष्टींचा आश्रमांत रहाणाऱ्या प्रियंवदा आणि अनुसयेला कोठून अनुभव असणार? शकुंतलेला झालेले विकार हा दुष्यंताच्या दर्शनामुळें उद्‌भवलेली एक विकृति असावी असें सुचवतांना अनुसया शकुंतलेला जें बोलतें तें ऐकून कोणत्या जाणत्या माणसाला हंसू येणार नाहीं? ती म्हणतें, "गडे शकुंतले, प्रेमविषयक गोष्टींत आम्हां दोघांनाहि खरें म्हटलें तर कांहीं कळत नाहीं. पण गोष्टींच्या पुस्तकामधून जी प्रेमी जनाची स्थिति वर्णन करण्यांत येते तशी तुझी अवस्था झालेली मला दिसत आहे!" राजा शकुंतलेचें जेव्हां चुंबन घेण्याचा प्रयत्न करतो तेव्हां वृद्ध गौतमीबाई मध्येंच येऊन 'लडमडतात' आणि राजाची चांगलीच फजिती उडते, हा देखील एक गंमतीचा विनोदी प्रसंग आहे, असेंच म्हणावें लागेल. प्रणयप्रसंग ऐन रंगांत आला असतांना वडील माणसें तेथें उपस्थित होऊन त्या रंगाचा बेरंग करतात हा

अनुभव कोणत्या गुलहौशी तरुणांना नाहीं ? शकुंतलेला झालेली मदनबाधा ही भूतपिशाच्च बाधा आहे असें समजून गौतमी आत्याबाई तिच्यावर तीर्थ शिंपडतात. तें दृश्य बघून कोणाला हंसूं लोटणार नाहीं ? आश्रमाच्या तपोगंभीर वातावरणांत शकुंतलेसारख्या तरुणीनें प्रेमपाशांत सांपडणें ही गोष्ट त्या वातावरणाशीं विसंगत असल्यानें त्या विसंगतीचा विनोदासाठीं उपयोग करून घेण्याची मार्मिक दृष्टि कालिदासानें दाखविलेली आहे. प्रेम विषयावरचें प्रियंवदा आणि अनुसया यांचें 'ऐकिव' ज्ञान आणि मंत्रतंत्रानें 'मदनबाधा' दूर करण्याचा गौतमी आत्याबाईंचा वेडगळ प्रयत्न हे या विसंगतीवर आधारलेल्या विनोदाचे नमुने आहेत.

यानंतर सहाव्या अंकांत राजाचे शिपाई कोळयाला त्याच्या मुसक्या बांधून राजापुढें घेऊन येतात हाहि प्रसंग विनोदी आहे. राजाची आंगठी चोरल्याबद्दल चोराला शिरच्छेदाची शिक्षा कधीं होते आहे तें पहावयाला हे शिपाई अगदीं उत्सुक झालेले असतात. पण कोळयाला निर्दोषी म्हणून सोडून देण्याची जेव्हां राजाकडून आज्ञा होते, उलट त्याला आंगठीच्या किंमती एवढें बक्षिस देण्यासाठीं जेव्हां राजा सांगतो तेव्हां कोळयाकडे पहाण्याची त्या शिपायांची दृष्टि एकदम बदलून जाते ! कोळयाच्या हातांत पैसे पडलेले दिसतांच कोतवालसाहेब तर त्याचे एकदम परम स्नेही बनतात आणि त्याला घेऊन मजा करावयाला दारूच्या गुत्त्यावर जातात. राजाच्या शिपायाच्या स्वभावाचें कालिदासानें केलेलें मार्मिक विश्लेषण आजच्या काळांतील कांहीं पोलिस शिपायांना जसेंच्या तसे लागूं पडतें ! शिपायांच्या स्वभाववैशिष्ट्यावर कालिदासानें आधारलेला हा विनोद कोणालाहि सहज पटणारा आहे.

येथपर्यंत 'शाकुंतल' नाटकांतील बहुतेक सर्व शब्दनिष्ठ, प्रसंगनिष्ठ आणि स्वभावनिष्ठ विनोदाचें मी समालोचन केलेलें आहे. त्यावरून कालिदासाची प्रतिभा ही केवळ कवीची प्रतिभा नसून श्रेष्ठ विनोद-पंडिताला आवश्यक असणारें सामर्थ्यहि त्याच्या बुद्धीमध्यें होतें याचा कोणालाहि पडताळा पटल्यावांचून रहाणार नाहीं. हास्यविनोदाबद्दल स्वतः कालिदासाला काय वाटत होतें हेंहि त्यानें 'शाकुंतल' नाटकाच्या दुसऱ्या अंकाच्या शेवटीं सांगून ठेवलेलें आहे. हें वचन दुष्यंत राजानें विदूषकाला जरी 'बनविण्या'साठीं म्हणून वापरलें

असलें तरी त्या वचनांतील सत्यता अबाधित आहे आणि ती कालिदासाला अभिप्रेत होती, असें समजावयाला कांहीं हरकत नाहीं. तें वचन म्हणजे—

" परिहासविजल्पितं सखे
परमार्थेन नु गृह्यमतां वचः ! "

विनोदानें बोललेल्या गोष्टींचा अर्थ शब्दशः घ्यावयाचा नसतो हा कालिदासाचा विनोदाबद्दल संदेश आहे. हा संदेश जर खरोखर लोकांच्या ध्यानांत येईल तर एरव्ही थट्टामस्करीमुळें निर्माण झालेली कितीतरी भांडणें वांचतील आणि विनोदामुळें देवघेवीचें आणि खेळाडूपणाचें वातावरण समाजांत पसरावयाला पाहिजे हा खऱ्या विनोदाचा जो मुख्य हेतु आहे तो साध्य झाल्यावांचून रहावयाचा नाहीं !

## भारताचा महान् मूर्तिभंजक : : १०

अस्पृश्य वर्गाचे महान् पराक्रमी आणि क्रांतिकारक पुढारी डॉ. भीमराव रामजी आंबेडकर यांच्या वयाला आज पंचावन्न वर्षें पुरीं होत आहेत. उद्यांपासून यांच्या वयाला छप्पन्नावें वर्ष लागणार आहे. उद्यांची ही त्यांची पंचावन्नावी जयंती हिंदुस्थानांतील सहा कोटी अस्पृश्य जनता मोठ्या भक्तिभावानें आणि हर्षानें साजरी करील. आनंदाच्या ह्या त्यांच्या उत्सवांत भागीदार होण्याची आम्हालाहि इच्छा आहे. म्हणून ' नवयुग ' च्या सहस्रावधि वाचकांच्या वतीनें आंबेडकरांच्या पंचावन्नाव्या वाढदिवशीं अत्यंत आदरानें आम्ही त्यांना अभिवादन करतो, आणि उत्तम आरोग्य अन् दीर्घायुष्य त्यांना लाभो असें अंतःकरणापासून आम्ही इच्छितो. डॉक्टर आंबेडकर यांच्या अगाध बुद्धिमत्तेबद्दल, विशाल विद्वत्तेबद्दल आणि प्रचण्ड कर्तृत्वाबद्दल आमच्या मनांत पहिल्यापासूनच नितांत आदर आहे. हा आदर आम्ही अनेक वेळां व्यक्त केलेला आहे. तथापि, राजकीय मतभेदामुळें गेलीं कित्येक वर्षें त्यांच्यावर आणि त्यांच्या पक्षावर आम्हांला टीका करावी लागली. अत्यंत कठोर शब्दामध्यें त्यांच्या धोरणावर आम्हाला प्रहार करावे लागले. महात्मा गांधींच्या आणि काँग्रेसच्या राजकारणावर आंबेडकरांनीं आजपर्यंत जे निकराचे हल्ले चढविले तेंहि कांहीं कमी क्रूर आणि प्राणघातक नव्हते. आंबेडकरांनीं काँग्रेसचे जेवढें वाभाडे काढलें, तेवढे काँग्रेसभक्तांनींहि त्यांच्या पक्षाचें काढले. कोणी कोणाची गय केली नाहीं किंवा कोणी कोणावर दया दाखविलेली नाहीं. गेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणूकीमध्यें दोघां पक्षामधला हा विरोध फारच विकोपाला गेला. निवडणूकी जिंकण्यासाठीं दोघांनाहि आकाश पाताळ एक करावें लागले. कारण अपयश म्हणजे आत्मनाश हें दोन्हहिीं पक्ष ओळखून होतें. दोघांनाहि आपल्या सामर्थ्याचा सारखाच गर्व होता

म्हणून 'माझा ह्या निवडणूकींत पराभव झाला तर डोक्यावर मी गांधी टोपी चढवीन!' असें आंबेडकरांनीं कॉंग्रेसला छातीठोक आव्हान दिलें! कॉंग्रेसनें त्या आव्हानाचा स्वीकार केला. आणि आंबेडकरांच्या एकूण एक उमेदवारांचा पराभव करून 'आतां कधीं घालतां डोक्यावर गांधी टोपी!' असा त्यांनाच उलटा सवाल केला.



मध्यवर्ति आणि प्रांतिक निवडणूकींत कॉंग्रेसला प्रचंड यश मिळालें. साऱ्या देशांत कॉंग्रेसचा जयजयकार झाला. त्या जयजयकाराला "पुणें करार रद्द करा!" अशा हजारों आरोळ्यांचा जबाब मिळाला. प्रांताप्रांतामधाल्या कॉंग्रेस सरकारविरुद्ध आंबेडकरांनीं सत्याग्रहाची मोहीम सुरू केली. या मोहिमेमुळें स्पृश्य आणि अस्पृश्य समाजांतील तेढ जास्तच वाढली आणि पक्षविरोधाला जातीय कलहाचें हिंस्र स्वरूप मिळालें. धर्मांतराच्या चळवळीपासून सामान्य हिंदुसमाज आंबेडकरांवर आधींपासूनच उखडला होता, त्यानें त्या रागाचा या जातीय दंगलींत चांगलाच वचपा काढून घेतला. त्यामुळें अस्पृश्य वर्गाचा संताप अधिकच अनावर झाला. आणि मुस्लिम लीगला जाऊन मिळण्याची भाषा तो उघडपणें बोलूं लागला. स्पृश्य आणि अस्पृश्य समाज एकमेकांपासून कायमचे दुरावले जाणार एवढेंच नव्हें तर, जगाच्या अंतापर्यंत ते परस्परांचे कट्टर दुष्मन् रहाणार अशी भयाण चिन्हें जेव्हां दिसूं लागलीं, तेव्हां आमच्यासारख्या कांहीं पुरोगामी कॉंग्रेस भक्तांच्या काळजाचा ठावच सुटला. नऊ कोट मुसलमानांना खूष करण्यासाठीं कॉंग्रेस आपल्या जीवाचा जेवढा आटापीटा करते, त्याच्या निम्म्याने सुद्धां सहा कोटी अस्पृश्यांचें समाधान करण्याचा ती प्रयत्न करीत नाहीं, हा उघड उघड अन्याय आहे असे उद्‌गार अनेक प्रामाणिक कॉंग्रेस-जनांच्या तोंडून निघूं लागले. अशा परिस्थितींत सतरा डिसेंबर रोजीं घटना समितीमध्यें डॉ. आंबेडकर यांनीं अखंड हिंदुस्तानची आणि जातीय ऐक्याची प्रचंड गर्जना केली! ती ऐकून कॉंग्रेसमधले त्यांचे सारे विरोधक अक्षरशः कोलमडून पडले. आणि त्यांच्यावर दगड मारण्यासाठीं उगारलेले हिंदु समाजांतील लक्षावधि हात त्यांच्यावर पुष्पवृष्टि करण्यासाठीं एकदम वर झाले. जगांतील कोणतीहि संस्था या देशांतील ऐक्याच्या आड येऊं शकणार नाहीं. आणि अखंड

हिंदुस्तानांतच आपलें कल्याण आहे असें आज ना उद्यां मुसलमानांनाहि कळून येईल, ही आंबेडकरांच्या मुखांतून बाहेर पडलेली दोन अमर सत्यें होत. तीं ऐकून आम्ही स्वतः आंबेडकरांवर येवढे खूष झालों कीं यापुढें त्यांच्याविरुद्ध एक अक्षरहि आपण आतां लिहावयाचें नाहीं अशी गेल्या स्वातंत्र्यदिनाच्या पवित्र दिवशीं आम्ही शपथ घेतली, ती 'नवयुग' च्या वाचकांना माहितच आहे. देशाच्या स्वातंत्र्यप्रयत्नांत आंबेडकर आणि त्यांचे कोट्यावधि अनुयायी सामील व्हावेत म्हणून ते जें मागतील तें काँग्रेसनें त्यांना देण्यास आतां कबूल व्हावें असें त्या दिवसापासून आमचें मत झालें. वीस फेब्रुवारीला ब्रिटिश पंतप्रधान ह्यांनीं 'छोडेंगे हिंद' ची घोषणा केल्यानंतर तर हें मत अधिक दृढ झालें. कारण देशाच्या राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्नच आतां मिटला. आतां जातीय ऐक्याचा प्रश्नच काय तो बाकी उरला आहे. अठ्ठेचाळीसच्या जूनच्या आंत काय वाटेल तें करून हा प्रश्न आपल्याला मिटवलाच पाहिजे. म्हणून आंबेडकर आणि त्यांचा अस्पृश्य पक्ष अन् काँग्रेस आणि स्पृश्य हिंदुसमाज ह्यांची तडजोड कशी घडवून आणतां येईल याचा आम्हीं उत्कटतेनें विचार करूं लागलों. आंबेडकरांबद्दलचा पूर्वीचा विरोध आम्ही विसरलों आणि मनांतलें पूर्वग्रह आम्ही काढून टाकले. प्रेमानें आणि आपलेपणानें आम्ही त्यांच्याकडे पाहूं लागलों. त्याबरोबर त्याच्या व्यक्तिमत्वाचें आणि कर्तृत्वाचें जें आम्हांला ओजस्वी दर्शन झालें त्यानें आमचे डोळे आणि अंतःकरण अक्षरशः दिपून गेलें. आणि आमची मान आदरानें एकदम खालीं नमली. म्हणूनच त्यांच्या पंचावन्नाव्या वाढ दिवशीं अत्यंत प्रेमानें आणि सद्भावानें आम्ही त्यांना हें अभिवादन करीत आहोंत !



गेल्या पन्नास वर्षांमध्यें तरी माणसाचें मूल्यमापन राष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें करण्याची हिंदुस्तानच्या जनतेला संवय जडलेली आहे. त्यामुळें राष्ट्रीय राजकारणाचा जो पुरस्कार करतो त्याला लोक पायांखालीं तुडवितात. मनुष्य कितीहि विद्वान् असो, कर्तृत्ववान् असो किंवा चारित्र्यसंपन्न असो, त्याची राजकीय मतें जर राष्ट्रीय चळवळीच्या विरुद्ध असतील तर लोक त्याच्या विद्वत्तेकडे, कर्तृत्वाकडे किंवा चारित्र्याकडे ढुंकूनहि पहावयाला तयार होत नाहींत. किंबहुना असा माणूस हा विद्वान्, कर्तृत्ववान् किंवा नीतिमान् मुळीं असूंच शकत नाहीं असेंच लोक

धरून चालतात.' हें लिहित असतांना नामदार गोखले यांचें उदाहरण डोळ्यां-समोर उभें रहातें. लोकमान्य टिळकांच्या प्रभावी राजकारणावर आषक झालेली जनता, त्यांना त्यावेळीं विरोध करणाऱ्या नामदार गोखल्यांना काय शिव्या देत होती हें लहानपणीं आमच्या कानांनीं आम्ही ऐकलेलें आहे. त्या शिवीगाळींत कधीं कधीं आम्ही देखील सामील झालेलों होतों. टिळकप्रेमानें आंधळ्या झालेल्या महाराष्ट्रानें त्यावेळीं गोखल्यांचा जो अनन्वित छळ केला त्याची आठवण झाली कीं खरोखर अंगावर शहारा येतो. गोखल्यांच्या विरुद्ध कांहींहि लिहावयाचें किंवा बोलावयाचें लोकांनीं बाकी ठेवलें नाहीं. पण अलिकडच्या कॉंग्रेसच्या जमान्यांत गोखल्यापेक्षांहि आंबेडकरांचा जास्त छळ झाला. कारण गोखले ब्राह्मण होते. स्पृश्य हिंदु होते; पण आंबेडकर पडेल अस्पृश्य महार. शिवाय गोखल्यापेक्षां त्यांची वृत्ति पडली जास्त लढाऊ आणि बंडखोर ! त्यामुळें त्यांच्या छळाला कांहीं सीमाच राहिली नाहीं. त्यांच्याबद्दल जेवढें म्हणून गैरसमज करून घेतां येतील आणि त्यांच्या कार्याचा जेवढा म्हणून कांहीं विपर्यास करून घेतां येईल तेवढा बहुसंख्य समाजानें आजपर्यंत करून घेतला. त्यामुळें आंबेडकरांच्या जीवनाबद्दल त्यांच्या आचाराबद्दल, त्यांच्या विचाराबद्दल, त्यांच्या मताबद्दल, त्यांच्या आकांक्षाबद्दल बहुसंख्य समाजाला कांहींएक माहिती नाहीं. आंबेडकर हे हिंदू धर्माला, कॉंग्रेसला आणि गांधींना शिव्या देतात, वेद, पुराणें आणि मनुस्मृति जाळून टाका: असें म्हणतात, आणि हिंदू धर्म सोडून आपण दुसऱ्या धर्मांत जाणार असें अधून मधून सांगतात, एवढेंच काय ते त्यांच्याबद्दल सामान्य माणसांना ठाऊक आहे. म्हणून राजकीय पूर्वग्रहाचा काळा चष्मा डोळ्यावरून काढून टाकल्यावांचून आंबेडकरांच्या जीवनाचें आणि व्यक्तिमत्वाचें देदिप्यमान स्वरूप जनतेला कळून यावयाचें नाहीं.. आणि आंबेडकरांचें हें तेजस्वी दर्शन झाल्याखेरीज त्यांच्याबद्दल आदर आणि प्रेम स्पृश्य समाजाच्या अंतःकरणांत निर्माणहि होणार नाहीं.



डॉ. आंबेडकरांएवढा प्रचंड बुद्धीचा, विद्वत्तेचा आणि कर्तृत्वाचा दुसरा एकहि महाराष्ट्रीय माणूस आज आम्हाला तरी दिसत नाहीं ! भांडारकर, टिळक, रानडे, तेलंग, केतकर आणि राजवाडे ह्यांचीं निर्भेळ ज्ञानोपासनेची परंपरा तितक्याच तपश्चर्येनें आणि अधिकारानें पुढे चालवणारा महर्षी महाराष्ट्रांत आज कोण आहे हें

आम्ही विचारतो! वाचन, चिंतन आणि लेखन ह्याखेरीज आंबेडकरांना दुसरें जीवनच राहिलेलें नाहीं! ज्या ज्या विद्वानांना आपल्या व्यवसायाचा आणि व्यासंगाचा अभिमान वाटत असेल, त्यांनीं ज्ञानाचें अग्निहोत्र आपल्या प्रचंड ग्रंथालयांत अहर्निश पेटवून बसलेल्या ह्या ज्ञानयोग्याचें एकवार दर्शन घ्यावे म्हणजे त्याचा तो वृथा अभिमान तेथल्या तेथें जिरून जाईल! महार जातींत जन्माला आलेला हा माणूस वृत्तीनें, व्यासंगानें आणि अधिकारानें ब्राह्मणापेक्षांहि अधिक श्रेष्ठ आणि पवित्र असा ब्राह्मण आहे! एवढेंच नव्हे तर 'ब्रह्मर्षि' ह्या श्रेष्ठ पदवीपर्यंत जाऊन तो पोहोचलेला आहे. ज्या कोणा सनातनी ब्राह्मणाला आपल्या जन्मजात ब्राह्मण्याची घमेंड असेल त्यांनीं ह्या कर्मजात 'ब्राह्मणा'च्या घरांत जाऊन त्याचे शुचिर्भूत, सोज्वळ आणि ज्ञानमय जीवन पहावें, म्हणजे श्रीमुखांत बसल्यासारखा चेहरा करून नाहीं तो बाहेर पडला तर तुम्ही सांगाल तें आम्ही मान्य करूं! आतांपर्यंत आंबेडकरांनीं लिहिलेले ग्रंथ पाहिले आणि पुढें ते लिहिणार असलेले ग्रंथ विचारांत घेतले, म्हणजे त्यांची विशाल विद्वत्ता बघून कोणीहि थक्क झाल्यावांचून रहाणार नाहीं! धर्मशास्त्रापासून घटनाशास्त्रापर्यंत असा कोणताहि एक कठीण विषय नाहीं कीं ज्यामध्यें त्यांची प्रतिभा लीलेनें विहार करूं शकत नाहीं. गहन विषयाचें संशोधन करण्याचा त्यांचा हव्यास तर कोशकार केतकर आणि इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्या जातीचा आहे. आंबेडकरांच्या विद्वत्तेचें आणि व्यासंगाचें प्रतिबिंब त्यांच्या धार्मिक आणि राजकीय विचारसरणीमध्यें पूर्णपणें पडलेलें आहे. त्यामुळें त्यांच्या उच्चाराला आणि विचाराला एकप्रकारचा भारदास्त वजनदारपणा प्राप्त झाला आहे. मूळच्या त्यांच्या बंडखोर स्वभावांत सतत अभ्यासानें प्राप्त झालेल्या खंबीर आत्मविश्वासाची भर पडल्यानें, त्यांच्या भाषणांत आणि लेखनांत एकप्रकारची बेदरकार निर्भयता निर्माण झालेली आहे. म्हणून आपण जें बोलतों आहोंत किंवा सांगतों आहोंत तें खोटें आहे असें दाखविण्याची प्रत्यक्ष परमेश्वराची देखील प्राज्ञा नाहीं असा आवेश आणि उद्दामपणा त्यांच्या भाषणांत किंवा लेखनांत धगधगत असल्याचा आपल्याला भास होतो. त्यांतून, पहिल्या दर्जाचे ते कायदेपंडित असल्यानें तर्कशुद्ध वादविवाद करण्याचें कामी ते कोणालाहि सहजासहजीं हार जाणारे नाहींत.

आपल्या बिनतोड कोटिक्रमानें ते आपल्या प्रतिस्पर्ध्यांची बंभेरी उडवून टाकतात. त्यांचे विरोधक त्यांच्याविरुद्ध मनांतून खूप चरफडतात. पण त्यांच्या भेदक कोटिक्रमाला प्रत्युत्तर देण्याचें त्यांना धैर्य होत नसल्यामुळें त्यांची उपेक्षा किंवा उपहास करणें एवढाच आत्मसंरक्षणाचा मार्ग त्यांना मोकळा रहातो. आंबेडकरांच्या बौद्धिक तपश्चर्येचें सामर्थ्य ज्यांना माहित आहे ते त्यांना अतिशय वचकून तरी असतात नाहींतर ते त्यांच्या कधीं वाटेलाहि जात नाहींत !



भारतीय जीवनांत जें जें म्हणून कांहीं उज्ज्वल आणि उदात्त आहे, त्याबद्दल डॉक्टरांच्या अंतःकरणांत अभिमानाचें ज्वलंत भांडार भरलेलें आहे. किंबहुना, डॉक्टर म्हणजे स्वाभिमानाचा एक जळता ज्वालामुखीच होत. अखंड हिंदुस्थानबद्दल त्यांना प्रचंड अभिमान आहे. कोणत्याहि प्रश्नाकडे प्रांताच्या किंवा भाषेच्या कोणत्या दृष्टीनें पहावयाला ते मुळीं तयारच नाहींत. या देशामध्यें प्रत्येक प्रांताची किंवा जातीची निरनिराळी संस्कृति असूं शकते आणि त्या भिन्न भिन्न संस्कृतिचे विशेष जपणूकीनें रक्षण केलें पाहिजे असा कांगावा करणाऱ्यांना कच्चे खाऊन टाकावें असें त्यांना वाटतें. "संस्कृति म्हणजे काय आहे?" असे ते नेहमीं रागानें ओरडून विचारतात, "डाव्या बाजूनें पदर घ्यायचा कीं उजव्या बाजूनें ? मिरची कमी खायची कां जास्ती ! हीच ना तुमची संस्कृति ?" एक देश, एक भाषा, आणि एक संस्कृति हा राष्ट्रीय उद्धाराचा महामंत्र ते एकसारखे जपत असतात. सबंध हिंदुस्तानची एक भाषा असावी याची डॉक्टरांना विलक्षण तळमळ लागून राहिली आहे. "प्रांतिक भाषांची मला मुळींच पर्वा नाहीं. त्याची मागाहून व्यवस्था करतां येईल ! साऱ्या देशाला आधीं एका भाषेंत बोलायला शिकवा, म्हणजे बघा काय चमत्कार होतो आहे तो !" असे ते नेहमीं म्हणत असतात. एक राष्ट्राचा हा कट्टर पुरस्कर्ता महाराष्ट्राच्या पराक्रमी परंपरेचा, भाषेचा आणि प्राचीन साहित्याचा तितकाच कडवा अभिमानी आहे. डॉक्टरांच्या सारखी सोपी, सुंदर आणि प्रभावी मराठी भाषा लिहिणारे आणि बोलणारे विद्वान् महाराष्ट्रांत कितीसे आहेत ? मराठी संत वाङ्मय तर अहर्निश त्यांच्या मनीमुखीं घोळतें आहे. संस्कृत भाषेवरील त्यांच्या प्रेमाला तर मर्यादाच नाहीं ! त्या भाषेंत ज्ञानाचा आणि सौंदर्याचा महासागर हेलावतो आहे असें ते म्हणत असतात. आणि

आपल्या अस्पृश्यतेमुळें आपल्याला संस्कृत भाषेऐवजीं दरिद्री पर्शियन भाषा शिकावी लागली या विचारानें तर त्यांच्या सर्वांगाचा संताप होतो.



आंबेडकर हे हिंदुधर्मावर प्रखर टीका करतात. आणि 'मनुस्मृति जाळा' असें म्हणतात. यावरून ते चार्वाकापेक्षांहि भयंकर नास्तिक आणि गझनीच्या महंमदापेक्षांहि क्रूर हिंदुद्वेष्टे असले पाहिजेत अशी पुष्कळांनीं आपली समजून करून घेतलेली आहे, पण ही समजूत फार खोटी आहे. एका भाविक आणि श्रद्धाळू पित्याच्या पोटीं त्यांचा जन्म झाला आहे. आणि शुचिर्भूत धार्मिक वातावरणांत त्यांचे सारें लहानपण गेलेलें आहे. हिंदु, बुद्ध, ख्रिस्ती आणि इस्लाम या ह्या जगांतील प्रमुख धर्मांचा अभ्यास करण्यांत त्यांचा तर सारा जन्म गेलेला आहे. ह्यांत त्यांच्या चिंतनशील स्वभावाची भर पडली असल्यामुळें त्यांची वृत्तीच मुळीं अध्यात्म बनलेली आहे. मनुष्याच्या शरीरापेक्षां त्याचा आत्मा अधिक महत्वाचा आहे आणि धर्मावांचून आत्म्याचा विकास होणें अशक्य आहे असें त्यांचें निश्चित मत आहे. मनुष्याच्या शरीराचा, बुद्धीचा आणि आत्म्याचा कोणत्या धर्मामध्यें जास्तींत जास्त विकास होईल ह्यांची त्यांना चिंता लागून राहिलेली आहे. किंबहुना, तें त्यांच्या जीवनामधलें एक महान् प्रश्नचिन्हच होऊन बसलेलें आहे! हिंदुधर्मातील चातुर्वर्ण्याच्या चौकटीनें त्या धर्माचा आणि ह्या देशाचा नाश झाला ह्याबद्दल त्याची खात्री झालेली आहे. चातुर्वर्ण्याच्या दडपशाहीमुळें हिंदुधर्मांत मनुष्याची बौद्धिक आणि आध्यात्मिक उंची वाढूं शकत नाहीं. म्हणूनच केवळ त्यांना धर्मांतराची आवश्यकता वाटते. त्यांना हिंदुधर्म पाहिजे आहे, पण चातुर्वण्य नको आहे. हिंदुधर्मांतील कांहीं दोष काढून टाकले तर तो धर्म किती महान् होईल ह्या त्यांच्या पुष्कळ ठिकाणच्या उद्गारांवरून त्यांच्या अंःतकरणाच्या तळाशीं हिंदुधर्माविषयीं गाढ प्रेम असावें असें निश्चित वाटतें. त्यांची धर्मांतराची चळवळ ही हिंदुधर्माच्या विध्वंसाची नसून तीं हिंदुधर्माच्या सुधारणेची चळवळ होती. चातुर्वर्ण्याची हुकुमशाही नष्ट करून हिंदुधर्माची रचना समतेच्या आणि लोकशाहीच्या पायावर करा, असें टाहो फोडून ते सांगत आहेत. ह्यावरून ते काय हिंदुसमाजाचे आणि हिंदुधर्माचे कट्टर दुष्मन् ठरतात होय? धर्मांतराविषयीं बोलतांना ते एकदा म्हणाले, "मी आणि माझें अनुयायी मुसलमान झालों असतों तर कोट्यावधि रुपये आमच्या

समाजाच्या पायावर ओतले गेले असते हें तुम्हीं निश्चयानें समजा ! माझ्या मनांत तसा सूड आणि द्वेष असता तर पांच वर्षांच्या आंत मी ह्या देशाचें वाटोळें करूं शकलों असतों. पण ह्या देशाच्या इतिहासांत विध्वंसक म्हणून स्वतःच्या नांवाची नोंद करून घेण्याची मला मुळींच इच्छा नाहीं ! ”



स्पृश्य-समाज आंबेडकरांवर सर्वांत जास्त कशामुळें जळत असेल तर तो महात्मा गांधी आणि कॉंग्रेस यांवरील त्यांच्या प्रखर आणि दाहक टीकेमुळें ! त्यामुळें ते हिंदी राष्ट्राचे आणि स्वातंत्र्याचे दुष्मन् आहेत, असा त्यांच्याविरूद्ध कॉंग्रेसनिष्ठ जनतेमध्यें वारंवार प्रचार केला जात असे. जनाब जीनांच्या पावलावर पाऊल टाकून ते आपल्या जमातीसाठीं स्वतंत्र मतदार संघ मागत आहेत, अस्पृश्य जनतेसाठीं गांवोगाव ‘अस्पृश्यस्थानें’ त्यांना हवीं आहेत आणि देशांतील प्रतिगामी गटांशीं संगनमत करून ते हिंदी स्वातंत्र्याच्या प्रगतीचा मार्ग रोखून धरीत आहेत, असें विपर्यस्त स्वरूप सामान्य माणसाच्या दृष्टीनें त्यांच्या राजकारणाला प्राप्त झालें. किंबहुना अस्पृश्य वर्गांतील लोकांना भारी पगाराच्या आणि मोठमोठ्या नोकऱ्या मिळवून देण्यापलिकडे त्यांच्या राजकीय आकांक्षांना अधिक उदात्त आणि व्यापक स्वरूप नसलें पाहिजे, अशीच पुष्कळांनीं आपली कल्पना करून घेतली. म्हणून आंबेडकरांच्या राजकारणाविषयीं लोकांच्या झालेल्या ह्या सर्व समजुती चुकीच्या कशा आहेत हें आपण आधीं समजून घेतलें पाहिजे. ब्रिटिश सत्ता हा हिंदी स्वातंत्र्याच्या मार्गांतला एक मोठा अडथळा आहे ह्या एकाच कल्पनेवर गेलीं पंचवीस वर्षे कॉंग्रेसनें आपलें राजकारण चालविलेलें आहे. त्यामुळें ब्रिटिश लोक ह्या देशांतून गेले कीं देशाला स्वातंत्र्य मिळालें अशी कॉंग्रेसनें आपली समजूत करून घेतली होती. ही समजूत किती चुकीची आहे याचा सध्यां आपणांला जितका पडताळा येत आहे, तितका पूर्वीं कधींच आलेला नाहीं. आंबेडकर हे लोकशाहीचे आणि समाजवादाचे कट्टर पुरस्कर्ते आहेत. जातिभेदाप्रमाणें पैशाचेहि सारे भेद त्यांना तोडून टाकावयाचे आहेत ! स्वतंत्र हिंदुस्थानांत लोकशाही आणि समाजवाद प्रस्थापित करण्याच्या मार्गांत हिंदूसमाजांतले उच्च-नीच जातिभेद आणि अस्पृश्यता, हे एकाहून एक असे प्रचंड अडथळे आहेत अशी त्यांची समजूत आहे. देशांत चातुर्वर्ण्यप्रधान समाजरचना जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत समाजवाद या देशांत मूळ धरणें अशक्य आहे, असें त्यांना निश्चयानें वाटतें.

भांडवलशाहीची तर त्यांना अतिशयच चीड आहे. सत्ताधारी आणि धनिक वर्गानें श्रमजीवि अस्पृश्यांची धार्मिक छळाबरोबर किती राक्षसी आर्थिक पिळवणूक केली त्याची कल्पना त्यांच्याखेरीज दुसऱ्या कोणाला असणार बरें? राष्ट्रवादाच्या सोज्वळ नांवाखालीं शेतकरी आणि कामकरी वर्गाला गिळणाऱ्या भेसूर भांडवलशाहीचे प्रतिनिधी काँग्रेसच्या छावणीमध्यें उजळ माथ्यानें वावरत असलेले आंबेडकरांच्या भेदक दृष्टीला दिसले नसतील, असें कसें म्हणावें?



अशाही परिस्थितींत साम्राज्यशाहीविरोधाच्या पातळीवर आंबेडकर आणि काँग्रेसची एकजूट होऊं शकली असती. पण, अस्पृश्यतानिवारणाबाबत काँग्रेसनें जी एक भूमिका घेतली तिच्यामुळें काँग्रेसशीं सहकार्य करणें आंबेडकरांना अगदीं अशक्य होऊन बसले. अस्पृश्यतानिवारण हा महात्मा गांधींच्या जीवनांतला एक महान् निदिध्यास आहे. त्यांच्याच प्रयत्नामुळें हा प्रश्न काँग्रेसच्या कार्यक्रमामध्यें समाविष्ट झाला, हें खरें. पण अस्पृश्यतानिवारणाकडे बघण्याचा गांधींचा दृष्टिकोण हा सर्वस्वी भूतदयावादी आणि भावनाप्रधान आहे. अस्पृश्यतानिवारणाकडे आंबेडकर हे शुद्ध न्यायाच्या नि समतेच्या दृष्टीनें पहातात. कायद्याच्या मदतीनें स्पृश्य समाजाइतकी सामाजिक आणि आर्थिक प्रतिष्ठा अस्पृश्य-वर्गाला प्राप्त करून देणें, हा अस्पृश्यतानिवारणाचा एकच मार्ग आहे, असें त्यांना वाटतें. महाराला 'हरिजन' म्हणून त्याला 'सोंवळा आणि पवित्र' बनविणें म्हणजे त्याच्या आत्मोद्धाराच्या बुंध्याशीं कुऱ्हाड घालण्यासारखें आहे, असें ते म्हणतात. 'महाराला महार' आणि 'भंग्याला भंगी' म्हटलें तरच तो अस्पृश्यतेविरुद्ध चवताळून उठतो आणि बंड करावयाला तयार होतो असें त्यांचें मत आहे. महात्मा गांधींनीं आणि काँग्रेसनें अस्पृश्यतानिवारणाचें कांहींहि कार्य केलेलें नाहीं, ही आंबेडकरांची भूमिका आम्हांला मान्य नसली तरी, ब्रिटिश साम्राज्यशाही देशांतून उखडून टाकण्यासाठीं महात्माजींनीं जसें निकराचें युद्ध केलें, तसें समाजांतील अस्पृश्यतेचें निर्दाळण करण्यासाठीं स्पृश्य समाजाविरुद्ध त्यांनीं बंड कां पुकारलें नाहीं, हा आंबेडकरांचा आक्षेप मात्र आम्हाला रास्त वाटतो. स्पृश्य समाजाच्या भावना न दुखविण्याच्या बाबतींत महात्माजी जो एवढा हळवेपणा दाखवितात, तो आम्हांला पटत नाहीं!



अस्पृश्यता हें स्पृश्य जनतेच्या हांतून शतकानुशतकें घडलेलें एक पाप आहें; तें त्यांनींच पश्चातापपूर्वक धुवून काढलें पाहिजे, ही महात्माजींची भूमिका आहे. तर स्पृश्य समाजाला झालेल्या पश्चातापाबद्दल आणि अस्पृश्यतानिवारण करण्याच्या त्यांच्या पात्रतेबद्दल आंबेडकर हे पूर्णपणें उदासीन आहेत. अस्पृश्यांचा उद्धार अस्पृश्यच करूं शकतील आणि अस्पृश्यांनींच तो केला पाहिजे, हें त्यांचें सांगणें आहे. काँग्रेसनें आरंभापासून ही अस्पृश्यतानिवारणाची जोरदार भूमिका घेतली असती आणि आंबेडकरांशीं सहकार्य करून तो कार्यक्रम सर्वस्वी त्यांच्या-कडेच सोंपवून दिला असता, तर आज सहा कोटी अस्पृश्य जनता काँग्रेसच्या बरोबर असल्याचें दृश्य जगाला दिसलें असतें ! ‘ हिंदुस्तानातील अस्पृश्य वर्गाचा मीच केवळ एक नेता आहे,’ हा गर्व महात्माजींनीं बाळगून आंबेडकरांच्या स्वाभिमानाला डंख केला नसता, तर सर्व अस्पृश्यांचा आपल्या नेतृत्वाखालीं एक काँग्रेसविरोधी गट बनविण्याची इच्छा त्यांना कधींहि झाली नसती ‘ शेड्यूल्ड कास्टस् फेडरेशन ’ हें महात्मा गांधींच्या अहंकाराला आंबेडकरांनीं दिलेलें प्रखर उत्तर आहे. ह्या पक्षांतील लोकांची आंबेडकरांबद्दलची जाज्वल्य निष्ठा बघून डोळ्यांत पाणी येतें. आंबेडकर हें त्यांचें एकमेव दैवत होऊन बसलेलें आहेत. आंबेडकर सांगतील त्याकरितां प्राण देण्याची आणि सर्वस्वाचा होम करण्याची ह्या लोकांची तयारी आहे. इतकी लढाऊ संघटना देशांतील कोणत्याहि राजकीय पक्षाची नसेल ! महात्मा गांधींच्याबद्दल मनांत विरोधाची एवढी भावना असतांनाहि केवळ त्यांच्या इच्छेला मान देऊन आणि त्यांचे प्राण वांचविण्यासाठीं आंबेड-करांनीं ‘ पुणें करारा ’वर सही केली, आणि अस्पृश्यांसाठीं स्वतंत्र मतदारसंघाची मागणी त्यांनीं मागें घेतली. ‘ पुणें करारा ’नें अस्पृश्य-वर्गाचा फायदा झाला नाहीं, असें नाहीं. स्पृश्य हिंदूंच्या न्याय्य हक्काचा चांगलाच लचका तोडून महात्माजींनीं तो अस्पृश्यांच्या पदरांत टाकला. तथापि, ज्या भावनेनें आणि खेळाडू वृत्तीनें आंबेडकरांनीं ‘ पुणें करारा ’वर सही केली, तें सहकार्य आणि तो खेळाडूपणा काँग्रेसनें मात्र पुढें आंबेडकरांशीं दाखविला नाहीं, हें अगदीं सत्य ! ‘ स्पृश्य हिंदू ’च्या बहुमताच्या आधारावर माझें आणि माझ्या पक्षाचें राजकीय जीवन नेस्तनाबूत करण्याचा गांधींजीं आणि काँग्रेसनें प्रयत्न केलेला आहे ’ ह्या आंबेडकरांच्या आरोपाला उत्तर देण्याला निदान आमच्याजवळ तरी मुळींच तोंड नाहीं !



